# नवभारत

एप्रिल २०११

भारतीय राष्ट्रीय काँग्रेस (१९११-१९३५)

काँग्रेस पक्ष व घटनात्मक विकास (१९३६-१९६०)

भारतीय राष्ट्रीय काँग्रेस : प्रारंभीचा काळ

काल, आज आणि उद्या

जवाहरलाल नेहरू आणि काँग्रेस

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६४। अंक ७। एप्रिल २०११
फाल्गुन/चैत्र शके १९३२-१९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## एप्रिल २०११

## अनुक्रमणिका

# अतिथी संपादक मनोगत

डिसेंबर २०१० मध्ये भारतीय राष्ट्रीय काँग्रेसला १२५ वर्षे पूर्ण झाली. आधुनिक भारताच्या इतिहासामध्ये या पक्षाने अत्यंत महत्त्वाची जबाबदारी पार पाडली आहे. स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये काँग्रेस पक्ष भारतीय स्वातंत्र्यासाठी चालविण्यात आलेल्या राष्ट्रीय चळवळीचे पुढारपण करीत होता. या काळात न्या. रानडे, गोपाळ कृष्ण गोखले, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, पंडित जवाहरलाल नेहरू, मौलाना आझाद, सरदार पटेल यांच्यासारखे असामान्य कर्तृत्वाचे पुढारी काँग्रेस पक्षाने तयार केले आणि त्यांनी राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीचे अभिनव असे राजकीय तत्त्वज्ञान सिद्ध केले. स्वातंत्र्योत्तर काळात भारताच्या राष्ट्रनिर्मितीच्या प्रक्रियेमध्ये काँग्रेसने मोलाची भूमिका बजावली आणि येथील लोकशाही व्यवस्था स्थिर करण्यात गेली ६० वर्षे कधी सत्ताधारी पक्ष म्हणून तर कधी विरोधी पक्ष म्हणून त्यांनी महत्त्वाची भूमिका बजावलेली आहे.

काँग्रेसच्या राजकारणाचे पाच वेगवेगळे टप्पे पाडता येतात. या टप्प्यांमधून त्या पक्षाने आपली राजकीय वाटचाल केलेली आहे. ते टप्पे खालीलप्रमाणे :

**१) पहिला टप्पा १८८५ ते १९१० :**

या कालखंडामध्ये काँग्रेस पक्षावर नेमस्त उदारमतवादी नेत्यांचा प्रभाव होता. धर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद लोकशाही आणि राजकारणाचे आध्यात्मिकीकरण हे त्यांचे योगदान. १९०४-०५ च्या वंगभंग चळवळीत जहाल पक्षाचा प्रभाव वाढू लागला आणि काँग्रेसमध्ये अंतर्गत संघर्षाला सुरुवात झाली.

**२) दुसरा टप्पा १९११ ते १९३५ :**

जहालांनी आक्रमक धोरणाचा पुरस्कार केला म्हणून त्यांना इंग्रजांनी दडपून टाकले, पण नंतर जहालांचा प्रभाव वाढू लागला. पुढील २५ वर्षांत असंख्य राजकीय चळवळींचा उदय झाला. टिळकांची होमरूल चळवळ, गांधींची चंपारण्य आणि रौलेट ॲक्टविरुद्धची चळवळ, असहकार चळवळ, विविध कामगार चळवळी, शेतकरी चळवळी यांचा या काळात जन्म झाला. स्वतंत्र दलित चळवळ, ब्राह्मणेतर चळवळ आणि समाजसत्तावादी चळवळ या याच काळात सुरू झाल्या. काँग्रेस पक्षाभोवती या चळवळी सुरू झाल्या.

**३) तिसरा टप्पा १९३६ ते १९६० :**

राजकीय चळवळी घटनात्मक मार्गाने सुरू झाल्या. लोकांनी लोकशाहीच्या माध्यमातून स्वातंत्र्याची मागणी केली. १९३५ चा कायदा झाला, त्याप्रमाणे निवडणूक जिंकून काँग्रेसने सरकार बनवले. पूर्ण स्वातंत्र्यासाठी काँग्रेसची चळवळ सुरू झाली. १९४२ ची चलेजाव चळवळ ही महत्त्वाची चळवळ होती. घटनात्मक विकासाचे कार्य, क्रिप्स शिष्टाई, त्रिमंत्री योजना, घटना समितीची स्थापना, राज्यघटनेची निर्मिती आणि भारतीय गणराज्यांची स्थापना यामधून भारताचे स्वातंत्र्य पूर्ण झाले. १९५० ते १९६० या काळामध्ये महत्त्वाच्या घटनादुरुस्त्या झाल्या. भाषावार प्रांतरचना होऊन भारतीय संघराज्य भाषेच्या पक्क्या अधिष्ठानावर उभे राहिले. संयुक्त महाराष्ट्राची स्थापना हा घटनात्मक विकासाचा टप्पा होता. याच काळात सामुदायिक विकास योजना, लोकशाही विकेंद्रीकरण आणि पंचवार्षिक योजना यांची सुरुवात झाली आणि पंडित नेहरूंनी धर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद, लोकशाही समाजवाद आणि अलिप्ततावादी परराष्ट्र धोरण यांच्या आधारावर भारतीय राज्यव्यवस्था उभी केली.

**४) चौथा टप्पा १९६१ ते १९८५ :**

भारतीय राजकारणामधील हे अतिशय धोकादायक असे पाव शतक होते. या काळामध्ये काँग्रेस पक्षाचे नेतृत्व

श्रीमती इंदिरा गांधी यांच्याकडे होते. या काळामध्ये भारताला १९६२, १९६५, १९७३ अशा तीन युद्धांना तोंड द्यावे लागले. १९६६ व १९७२ साली दुष्काळ पडले. काँग्रेस पक्षामध्ये फूट पडली. पण राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया जोरकसपणे चालू राहिली. पंडित नेहरूंनी सुरू केलेल्या आर्थिक विकासाची प्रक्रिया देशाला पुढे नेत राहिली. १९६० साली काँग्रेस पक्षाचा प्रभाव कमी झाला व १९६९ मध्ये या पक्षाला कायमस्वरूपी कमजोर करणाऱ्या काँग्रेस पक्षात फूट पडली. काँग्रेसचा व्यापक सामाजिक पाया संकुचित झाला. नवनव्या सामाजिक शक्तींनी काँग्रेसच्या प्रभुत्वाला आव्हान द्यायला सुरुवात केली. जयप्रकाश नारायण यांची नवनिर्माण चळवळ महत्त्वाची होती. त्यामुळे इंदिरा गांधींनी आणीबाणी घोषित केली. १९७५ साली त्यांचा निवडणुकीत पराभव झाला व नवे जनता सरकार स्थापन झाले. पण ते अस्थिर होते. १९८० साली इंदिराजी पुन्हा सत्तेवर आल्या; पण घडी बिघडली ती बिघडलीच. प्रादेशिक पक्ष निर्माण झाले व विविध दहशतवादी बंडखोरीने सरकार त्रस्त झाले. त्यातच इंदिरा गांधींची हत्या झाली. हा काळ काँग्रेसच्या दृष्टीने अत्यंत कसोटीचा ठरला.

**५) पाचवा टप्पा १९८६ ते २०१० :**

या टप्प्यामध्ये काँग्रेसच्या ऱ्हासाला सुरुवात झाली. राजीव गांधी यांच्यानंतर पक्षाचा प्रभाव ओसरत गेला. प्रथम जनता दल आणि नंतर भारतीय जनता दल हे पक्ष पर्यायी पक्ष म्हणून उभे राहिले. काँग्रेस पक्षाला शेकडा २५ टक्के मते मिळाली. त्याचा परिणाम म्हणून पक्ष संकुचित झाला. त्यामुळे आघाड्यांचे सरकार निर्माण झाले. काँग्रेस आणि भारतीय जनता पक्ष या दोन्ही राजकीय पक्षांनी आपल्या समविचारी प्रादेशिक पक्षांना घेऊन आपले आघाडीचे सरकार बनवले.

काँग्रेस पक्षाने २००४ पासून आघाडी सरकार यशस्वी रीत्या चालविले आहे. आपल्या ऱ्हासकाळातसुद्धा काँग्रेस पक्षाची तीन महत्त्वाची योगदाने म्हणजे काँग्रेस पक्षाने नव्या आर्थिक धोरणाचा पुरस्कार करून देशाला विकासाच्या मार्गावर अग्रेसर केले. नवे आर्थिक धोरण व राज्यांचा हस्तक्षेप यांच्यामध्ये व्यवस्थित असा मेळ घालून भारताला जगातील शीघ्र गतीने प्रगती करणारी अर्थव्यवस्था म्हणून नाव मिळवून दिले. विकासाचे ताणतणाव ध्यानात घेऊनही लोकशाही व्यवस्था चांगल्या प्रकारे राबविण्याचा प्रयत्न केला. अशा प्रकारे गेल्या सव्वाशे वर्षांत काँग्रेस पक्षाने भारतीय राष्ट्राच्या जडणघडणीत महत्त्वाची भूमिका बजावली आणि अनेक सामाजिक व राजकीय चळवळींना आपल्या संघटनेत स्थान दिले. १९३० साली. द. भारतातील ब्राह्मणेतर चळवळीतील महत्त्वाचे घटक काँग्रेस पक्षात सामील झाले व त्यांनी कामराज नाडर, केशवराव जेधे, शंकर यांच्यासारखे नेते काँग्रेसला दिले. सामाजिक अभिसरणाची दुसरी प्रक्रिया १९५५-५६ साली सुरू झाली. त्या प्रक्रियेप्रमाणे वेगवेगळ्या राज्यांची भाषिक तत्त्वांच्या आधारावर फेरमांडणी झाली. जमीनदारी रद्द करण्यात आली व 'कसेल त्याची जमीन' हे धोरण अमलात आले. शिक्षणाचा प्रसार झाला. त्यातून मध्यम शेतकरीजातीतून नवा सधन वर्ग निर्माण झाला. त्यांनी १९५७ नंतर विविध राज्यांत सत्ता आपल्या ताब्यात घेतली. यालाच डॉ. एम. एन. श्रीनिवास वरचढ जातींचे राजकारण असे संबोधितात. द. व प. भारतात ही प्रक्रिया झाली आणि काँग्रेस पक्षाने हे सामाजिक परिवर्तन चांगल्या प्रकारे आत्मसात केले. समाजात निर्माण होणाऱ्या सामाजिक अंतर्विरोधांचे निराकरण करण्याचा, संघर्षाची टोके बोथट करून विरोधकांना सत्तेच्या राजकारणात सामील करण्याचा काँग्रेसचा अनुभव मोठा होता. त्यातून अनेक प्रश्नांना उत्तरे शोधली गेली.

भारतात राष्ट्रीय एकात्मतेस आव्हान देणाऱ्या अनेक चळवळी निर्माण झाल्या. त्यांनी स्वतंत्र राज्यांसाठी सशस्त्र संघर्ष छेडले. त्यांत नागालँड, मिझोराम, आसाम, पंजाब व जम्मू-काश्मीर येथील संघर्ष तीव्र असे संघर्ष होते. भारतातील लोकशाही व्यवस्थेच्या मदतीने मिझोराम व पंजाब येथील संघर्षांचे बऱ्यापैकी निराकरण झाले आहे. आसामात आसाम गणपरिषदेशी करार करून मुख्य संघर्ष सोडवण्यात आला; पण सार्वभौम व स्वतंत्र

आसामची मागणी करणाऱ्या उल्फाशी गेली ३० वर्षे संघर्ष सुरू होता. आता 'उल्फा'स राष्ट्रीय प्रवाहात कसे आणायचे, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. नागालँडमधील संघर्ष सर्वांत अवघड व दीर्घकाळ चालणारा असून नागांचा विरोध तीव्र होता. आता नागा व लष्कर यांच्यात युद्धविराम झाला असून वाटाघाटी सुरू आहेत. नागांची मागणी 'ग्रेटर नागालँड'ची आहे; पण त्यास मणीपूर, अरुणाचल या प्रांतांचा विरोध आहे. जम्मू व काश्मीरात निवडणुका झाल्या. काँग्रेस पीडीपी सरकारने बऱ्यापैकी परिस्थिती नियंत्रणात आणली होती. पण काँग्रेसने कॉन्फरन्स सरकारकडे तो प्रश्न सोडवण्याची क्षमता दिसत नाही. विशेषतः उमर अब्दुल्ला यांचे सरकार भ्रष्ट व अकार्यक्षम ठरले. लाखो सैनिकांच्या उपस्थितीमुळे व कधी कधी त्यांनी केलेल्या अत्याचारांमुळे लोक नाराज आहेत. पाकिस्तानचा हस्तक्षेप इस्लामी दहशतवाद व काँग्रेस सरकारच्या मोठ्या चुका यांमुळे हा प्रश्न सोडवणे अवघड बनत आहे. या प्रश्नाची सोडवणूक करण्याचा प्रयत्न पण सुरू आहे. भारतीय संघराज्याचे स्वरूप जास्त लवचीक करून विविध प्रांतांतील प्रादेशिक स्वायत्तता व अस्मिता असणाऱ्या घटकांना त्यात कशा प्रकारे सामावून घ्यायचे, हा सध्याच्या सरकारपुढचा प्रश्न आहे. आता काँग्रेस पक्षाजवळ जुनी ताकद नाही; तरीही त्यांना हा प्रश्न सोडवणे गरजेचे आहे.

काँग्रेस पक्षाने पं. नेहरूंच्या काळात स्वतंत्र परराष्ट्र धोरण अमलात आणले आणि तीन महत्त्वाचे उपक्रम सुरू केले. ते सुरू करण्यात पं. नेहरूंचा वाटा महत्त्वाचा होता. १) त्यांनी अलिप्ततावादी धोरणाचा पुरस्कार केला व दोन्ही सत्तागटांत सामील न होण्याचे धोरण स्वीकारले. या धोरणाचा अनेक देशांनी पुरस्कार केला. २) बांडुंग येथे त्यांनी पहिली ॲफ्रो-आशियाई देशांची परिषद भरवण्यात वाटा उचलला आणि या परिषदेतच 'पंचशील'च्या तत्त्वांचा पुरस्कार करण्यात आला. ३) आपल्या देशात मोठे उद्योगधंदे व पायाभूत कारखाने उभे करून त्यांनी तिसऱ्या जगातील देशांना स्वावलंबी विकासाचा मार्ग स्वीकारण्याचा सल्ला दिला. भारतात त्याची त्यांनी अंमलबजावणी केली. त्या काळात भारतात चीन व पाकिस्तान यांच्याशी दोन संहारक युद्धे करावी लागली.

काँग्रेसच्या सव्वाशे वर्षांच्या राजकारणात भारतीय समाजातील अंतर्विरोध समर्थपणे सोडवण्याचा काँग्रेसचा प्रयत्न होता; पण याबाबतीत काँग्रेसला यश मिळाले नाही.

त्यांतील पहिला प्रश्न मुसलमानांच्या राजकीय आकांक्षांना राष्ट्रीय आकांक्षांमध्ये सामावून घेण्याचा होता. सध्या काही इतिहासकारांकडून काँग्रेसवर असा आरोप केला जातो, की या बाबतीत काँग्रेसची भूमिका ही बहुसंख्याकांच्या वर्चस्ववादाची होती. मुस्लिम लीगच्या या मागण्या हिंदुत्ववाद्यांच्या दबावाखाली काँग्रेसने मान्य केल्या नाहीत. 'मी सर्व भारतीय लोकांचे प्रतिनिधित्व करतो' ही गांधींची भूमिका त्यांचा अहंकार दाखवणारी व चुकीची होती. कॅबिनेट मिशनच्या वेळी नेहरूंनी केलेली टिपणी चुकीची होती. डॉ. आंबेडकरांनी Thoughts on Pakistan या ग्रंथात काँग्रेस नेतृत्वावर या अर्थाचीच टीका केली आहे. अर्थात हा प्रश्न न सुटण्यामागे ब्रिटिशांची भूमिका पण महत्त्वाची होती. जातीय निवाडा घोषित करून त्यांनी लीग व काँग्रेसमधील समझोत्याची शक्यता नष्ट केली. १९४० नंतर त्यांनी पाकिस्तानच्या मागणीचे मोठ्या प्रमाणात समर्थन केले. या सर्वांवर मात म्हणजे ॲटली यांची घोषणा, की ३०.६.४८ रोजी आम्ही भारताला स्वातंत्र्य देणार आहोत व भारतीय राजकीय पक्षांत समझोता झाला नाही, तर आम्ही संस्थानांची सत्ता संस्थानिकांच्या ताब्यात देणार आहेत. त्यामुळे काँग्रेस पक्षाला फाळणीचा निर्णय घ्यावा लागला. भारताचे ऐक्य न टिकवू शकणे, हे काँग्रेसचे मोठे अपयश होते.

दुसरा प्रश्न काँग्रेस व अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींच्या बाबतीत होता. डॉ. आंबेडकरांनी दलित चळवळ स्वतंत्रपणे चालवली. १९३२ मध्ये त्यांनी पुणे करार केला. प्रथम मजूर पक्ष स्थापन करून त्यांनी चांगले यश मिळविले; पण काँग्रेसने त्यांना मंत्रिपद दिले नाही. काँग्रेसने उदार आणि सहिष्णुवृत्ती दाखवून बाबासाहेबांना मदत करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यामुळे स्वातंत्र्योत्तर काळातही दलितांतील जागृत वर्ग काँग्रेसच्या राजकारणाच्या

विरोधात होता. उत्तर भारतात ज्येष्ठ काँग्रेस नेते जगजीवनराम यांच्यामुळे दलितांचा काँग्रेसला पाठिंबा होता. पण त्यांच्या मृत्यूनंतर तेवढ्या उंचीचा नेता काँग्रेस पक्षाजवळ नव्हता. काँग्रेसने मते मिळविण्यासाठी दलितांचा वापर केला; पण त्यांना खऱ्या अर्थाने सत्तेत सहभागी करून घेतले नाही. त्यामुळे उत्तर भारतात, विशेषतः उत्तरप्रदेश व पंजाब या प्रांतांत मोठ्या प्रमाणात दलितांनी श्री. काशीराम यांच्या बहुजन समाजपक्षास पाठिंबा दिला. आज बसप हा पक्ष उत्तर प्रदेशात सत्तेवर आहे व उत्तर प्रदेश व बिहार या दोन्ही प्रांतांत काँग्रेस पक्षाचा पाया ढासळला आहे. याचे खरे कारण असे आहे, की दलित जातींच्या मनामधील दुरावा कमी झालेला नाही. कारण रोजच्या व्यवहारात त्यांच्या आत्मसन्मानास इजा पोचते. त्यांचे रोजगाराचे, जमीनवाटपाचे प्रश्न सुटलेले नाहीत.

तिसरा न सुटलेला प्रश्न काँग्रेस-कम्युनिस्ट संबंधांचा आहे. १९८० नंतर भारतातील तिन्ही कम्युनिस्ट पक्ष सरकारच्या विरोधात काम करीत राहिले आहेत. काँग्रेसशी २००४-०८ या काळात कम्युनिस्ट पक्षांचे चांगले संबंध होते. आता मुख्य मुद्दा माओवाद्यांचा आहे. भाकप-मार्क्सवादी-लेनिनवादी या पक्षांचे अनेक गटांत विभाजन झालेले असले, तरी आंध्र प्रदेशातील क्रांतिकारक नेत्यांनी ही चळवळ पेलून धरली असून आदिवासी भागातील ६०-७० जिल्ह्यांवर त्यांचा प्रभाव आहे. आज मनमोहनसिंग सरकारपुढे नक्षलवाद्यांनी (म्हणजे भाकप-माले) यांना कसे रोखायचे, हा प्रश्न आहे. काँग्रेस-कम्युनिस्ट यांच्यातील परस्परसंबंधांचा प्रश्न लेनिन यांच्या काळापासून चर्चिला गेला; पण आजपर्यंत त्यांच्यातील अंतर्विरोधाचे निराकरण झालेले नाही.

काँग्रेस पक्षाने सव्वाशे वर्षे पूर्ण केल्याबद्दल 'नवभारत'चा हा अंक काढण्यात येत आहे. डिसेंबर २०१० च्या अंकात या विषयावरचे डॉ. अशोक चौसाळकर, डॉ. श्री. मा. भावे, प्रा. शैलेंद्र खरात व डॉ. दहिफळे यांचे लेख प्रकाशित झाले. आजच्या अंकात डॉ. भारती पाटील, डॉ. शिवाजी पाटील, डॉ. अवनीश पाटील व प्रा. श्री. मा. भावे यांचे लेख प्रकाशित करीत आहोत. आमच्या विनंतीस मान देऊन वरील लेखकांनी त्यांचे अभ्यासपूर्ण निबंध पाठवले, याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

**– डॉ. अशोक चौसाळकर**

# भारतीय राष्ट्रीय काँग्रेस (१९११-१९३५)

डॉ. भारती पाटील

सन १८८५ मध्ये स्थापन झालेल्या राष्ट्रीय काँग्रेसने भारतात राष्ट्रवादाची भावना निर्माण करण्यात यश मिळविले. काँग्रेस ही राष्ट्रीय चळवळीचे प्रतिनिधित्व करणारी एकमेव संघटना म्हणून मान्यता पावली. परंतु जहाल व मवाळांच्या मतभेदातून काँग्रेसमध्ये १९०७ साली पहिली फूट पडली. त्यानंतर काँग्रेसमध्ये मरगळ आली. काँग्रेसची सूत्रे मवाळांच्या हाती गेली. बनारस आणि कलकत्ता अधिवेशनांमध्ये काँग्रेसने स्वीकारलेल्या जहाल कार्यक्रमांना त्यांनी तिलांजली दिली. काँग्रेसमध्ये लोकमान्य टिळकांच्या नेतृत्वाखालील जहाल गटाने संघटित होण्याचे काही फुटकळ प्रयत्न केले, परंतु ते अपयशी ठरले; कारण स्वतः टिळक तुरुंगात होते. काँग्रेसच्या १९१३ पर्यंतच्या अधिवेशनांना फारसा प्रतिसाद मिळत नव्हता. एकूणच भारतीय राष्ट्रीय काँग्रेसमध्ये एक स्थितिशीलता आली.

परंतु पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीबरोबरच भारतातील राष्ट्रीय चळवळीला वेग आला. १९१४ च्या जूनमध्ये टिळकांची ६ वर्षांच्या कारावासानंतर मंडालेच्या तुरुंगातून सुटका झाली. त्यांनी सुटकेनंतर काँग्रेसमध्ये आलेली मरगळ दूर करून पुन्हा एकदा ब्रिटिश साम्राज्यवाद-विरोधी लढा तीव्र करण्याचा प्रयत्न सुरू केला. भारतीय राष्ट्रीय चळवळ आणि काँग्रेस यांच्यातील अभेद्य नात्याची टिळकांना जाणीव होती. म्हणूनच त्यांनी हा लढा काँग्रेसच्या व्यासपीठावरून सुरू करण्याचा निर्णय घेतला. त्यासाठी काँग्रेसमधील जहाल व मवाळांना एकत्र आणण्याची गरज होती. सुरत येथील काँग्रेस अधिवेशनात पडलेल्या फुटीमुळे काँग्रेसमधील मवाळ गटातही नाराजी होती. याच दरम्यान ॲनी बेझंट यांनी १९१४ साली आयरिश होमरूल चळवळीच्या धर्तीवर भारतात होमरूल चळवळ सुरू केली. होमरूल चळवळीला काँग्रेसचे पाठबळ मिळावे, अशी त्यांची अपेक्षा होती. परंतु त्या वेळी काँग्रेसमध्ये मवाळांचे वर्चस्व होते. टिळक आणि इतर जहाल नेत्यांना काँग्रेसमध्ये प्रवेश द्यावा, असा आग्रह ॲनी बेझंट यांनी धरला. टिळकांनी २७ ऑगस्ट १९१४ रोजी वृत्तपत्रांना लिहिलेल्या पत्रात भारतात ठिकठिकाणी झालेल्या हिंसक कृत्यांचा निषेध केला व त्यामुळे भारतीय राष्ट्रीय चळवळीची मोठी हानी झाली असून आता आपण आयर्लंडमधील होमरूल चळवळीप्रमाणे प्रशासनामध्ये सुधारणा करण्यासाठी लढा उभारला पाहिजे, असे स्पष्ट केले. टिळक आणि ॲनी बेझंट यांच्या प्रयत्नांना अखेर यश आले आणि डिसेंबर १९१५ झालेल्या काँग्रेस अधि-वेशनात जहाल नेतृत्वाने काँग्रेसमध्ये पुन्हा प्रवेश केला.

**होमरूल चळवळ**

काँग्रेसमधील प्रवेशाचा मार्ग मोकळा झाल्यानंतर लोकमान्य टिळकांनी एप्रिल १९१६ मध्ये मुंबई प्रांतात होमरूल लीगची स्थापना झाली. होमरूल लीग चळवळी-संबंधी काँग्रेसकडून संयुक्त योजना होत नसल्याचे पाहून ॲनी बेझंट यांनी सप्टेंबर १९१६ मध्ये होमरूल लीगच्या स्थापनेची घोषणा केली. मुंबई, मद्रास प्रांतांत अशा रीतीने लोकमान्य टिळक आणि ॲनी बेझंट यांनी स्वतंत्रपणे होमरूल लीगची स्थापना केली. दोन लीगमधील संघर्ष टाळण्यासाठी टिळकांच्या नेतृत्वाखालील होमरूल लीगने महाराष्ट्र, कर्नाटक, मध्यप्रांत व वऱ्हाड या प्रांतांत तर ॲनी बेझंट यांच्या नेतृत्वाखालील लीगने उर्वरित भारतात कार्य करावे, अशी विभागणी झाली. पत्रके काढणे, निरनिराळ्या भाषांत पुस्तिका काढून छापून त्या विकणे, जाहीर सभा घेऊन होमरूलविषयी लोकांना जागृत करणे अशा मार्गाने दोन्ही होमरूल लीगने प्रचाराचे रान उठविले. होमरूल लीगला मिळणारा लोकांचा वाढता प्रतिसाद पाहून इंग्रज सरकार अस्वस्थ झाले. होमरूल लीगच्या प्रचार मोहिमेला पायबंद घालण्यासाठी सरकारने प्रथम वृत्तपत्रविषयक १९१० च्या कायद्याचा बडगा उगारून सनदशीर राजकीय चळवळीचा पुरस्कार करणाऱ्या वृत्त-पत्रांची मुस्कटदाबी करण्याचे धोरण स्वीकारले. टिळकांना

अनुक्रमणिका

६० वर्षे पूर्ण होण्याच्या निमित्ताने एक लाखाचा निधी गोळा करण्याचा संकल्प करण्यात आला होता. २३ जुलै १९१६ रोजी हा निधी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात येणार होता. परंतु त्याच दिवशी ब्रिटिश सरकारने त्यांच्या-कडून दहा हजाराचे दोन जामीन आणि वीस हजाराचा जातमुचलका मागण्याबद्दलची नोटीस बजावली. त्यांच्या-विरुद्ध तिसरा राजद्रोहाचा खटला सुरू झाला. टिळकांचा बचाव करण्यासाठी बॅरिस्टर जिनांच्या नेतृत्वाखाली वकिलांची कुमक पुढे सरसावली आणि टिळकांची निर्दोष सुटका झाली. "माझ्यावर खटला दाखल करून सरकारने जणू होमरूल चळवळीला अधिमान्यताच दिली आहे." असे वक्तव्य टिळकांनी केले आणि होमरूलची चळवळ अधिक तीव्र केली. काँग्रेसची क्रियाशीलता लोप पावलेली पाहून अनेक काँग्रेस कार्यकर्ते लीगमध्ये सहभागी झाले. एप्रिल १९१७ पर्यंत जवळपास १४ हजार कार्यकर्ते टिळकांच्या लीगमध्ये सहभागी झाले होते. तर ॲनी बेझंट यांच्या लीगमध्ये मार्च १९१७ पर्यंत ७ हजार सदस्य झाले होते.

होमरूल चळवळीच्या वाढत्या प्रभावाला आळा घालण्यासाठी जून १९१७ मध्ये मद्रास प्रांतिक सरकारने ॲनी बेझंट यांच्या सहकाऱ्यांना अटक केली. या अटकेचा निषेध संपूर्ण देशभर झाला. टिळकांनी अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या बैठकीमध्ये असे सुचविले, की जर ॲनी बेझंट आणि त्यांच्या सहकाऱ्यांची सुटका झाली नाही, तर सविनय प्रतिकाराची चळवळ सुरू केली जावी. दुसरीकडे होमरूल चळवळीला पाठिंबा देण्यासाठी गांधीजींच्या सूचनेनुसार हजारो शेतकरी व कामगारांच्या सह्या घेण्यात आल्या. सरकार जेवढी दडपशाही वाढवत होते, तेवढा प्रतिकारही वाढत होता. हे लक्षात घेऊन अंतिमतः सरकारने आपले धोरण बदलले आणि सामोप-चाराची भूमिका स्वीकारली. प्रशासनामध्ये अधिकाधिक भारतीयांना समाविष्ट करून घेतले जाईल आणि जबाब-दारीचे सरकार हळूहळू भारतात स्थापन केले जाईल, अशी भूमिका त्याने घेतली.

१९१८ मध्ये मात्र होमरूल चळवळीचा प्रभाव हळू-हळू ओसरू लागला. याची अनेक कारणे होती. या काळात टिळकही व्हॅलेंटाइन चिरोल खटल्यानिमित्ताने इंग्लंडला गेले होते. ॲनी बेझंट यांनीही मवाळांची भूमिका उचलून धरली. सरकारने सुधारणा कायद्याची आश्वासने दिल्यामुळे काँग्रेसमधील मवाळाचा गट होमरूल चळवळी-पासून दुरावला. होमरूल चळवळ ही भारतातील पहिली संघटित राजकीय चळवळ होती. १९१८-१९ साली टिळकांच्या लीगचे ३८००० व बेझंट यांच्या लीगचे ३२००० सदस्य होते. म. गांधी यांच्या पुढील चळवळींना या संघटनेचा व कार्यकर्त्यांचा उपयोग झाला. खुद्द गांधी जिनांना बाजूस सारून होमरूल लीगचे अध्यक्ष झाले.

**लखनौ काँग्रेस**

डिसेंबर १९१६ मध्ये लखनौला काँग्रेसचे अधिवेशन होणार होते. या अधिवेशनात होमरूल लीगच्या कार्यकर्त्यांना आपली शक्ती दाखविण्याची संधी होती. त्याप्रमाणे दोन्ही लीगचे हजारो कार्यकर्ते लखनौच्या काँग्रेसच्या अधिवेशनाला हजर राहण्यासाठी गेले. टिळकांनी तर त्यासाठी एक विशेष रेल्वेही आरक्षित केली. ती पुढे काँग्रेस रेल्वे म्हणून मान्यता पावली. लखनौच्या अधिवेशनात जहाल आणि मवाळ या दोन्ही गटांचे नेते एकत्र आले. लखनौचे काँग्रेस अधिवेशन गाजले ते लखनौ करारामुळे. टिळक आणि ॲनी बेझंट यांच्या प्रयत्नाने काँग्रेस आणि मुस्लिम लीग यांनी एकत्र येण्याचे ठरविले आणि त्यांच्यात करार झाला. तो लखनौ करार म्हणून प्रसिद्ध आहे. या कराराने मुस्लिम लीगला झुकते माप दिले आहे, अशीही टीका काही काँग्रेस नेत्यांनी केली. परंतु याचा समाचार घेत लोकमान्य टिळक म्हणाले, "ब्रिटिश सरकारविरुद्धचा लढा आपण एकजुटीने दिला पाहिजे. त्यासाठी आपण आपला धर्म, वंश, विचारप्रणाली यांच्यातील मतभेद विसरले पाहिजेत." लखनौ कराराद्वारे हिंदुस्थानच्या राज्य-कारभारात आपल्याला कोणत्या स्वरूपाच्या सुधारणा हव्यात, याबद्दलचा आराखडा काँग्रेस आणि मुस्लिम लीग या पक्षांनी एकत्र येऊन जाहीर केला. म्हणूनच राष्ट्रीय चळवळीत या कराराला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले.

**महात्मा गांधींचा उदय**

१९१४ साली पहिले महायुद्ध सुरू झाले आणि भारतात राजकीय घटनांना वेग आला. लोकमान्य टिळकांची तुरुंगातून सुटका झाल्यानंतर त्यांनी ॲनी

बेझंट व इतर लोकांच्या सहकार्याने होमरूल चळवळीचे रान उठवून दिले. त्याच सुमारास म्हणजे १९१५ ला महात्मा गांधी दक्षिण आफ्रिकेतल्या २१ वर्षांच्या वास्तव्या-नंतर मायदेशी परतले. दक्षिण आफ्रिकेतील यशस्वी लढ्या-बद्दल त्यांचा जो मुंबईत सत्कार झाला, त्यास लोकमान्य टिळक उपस्थित राहिले होते. भारतात परतल्यानंतर मात्र गांधी राजकारणात सक्रिय झाले नाहीत. १९१५ साली झालेल्या मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनास गांधी उपस्थित राहिले. परंतु हिंदुस्थानासंबंधी त्यांनी कोणतेही मत व्यक्त केले नाही. दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांच्या दु:खाबद्दल मात्र ते बोलले. वास्तविकत: दक्षिण आफ्रिके-तील भारतीयांच्या प्रश्नांना गोपाळ कृष्ण गोखले यांनी १९१३ सालीच वाचा फोडली होती. गोखल्यांनी गांधींच्या निमंत्रणावरून दक्षिण आफ्रिकेला प्रत्यक्ष भेट देऊन तेथील भारतीयांचे प्रश्न समजून घेतले होते आणि ते काँग्रेसच्या व्यासपीठावरून मांडलेही होते. गोखले आणि गांधी यांच्या-तील गुरुशिष्याचे नाते त्यानंतर अधिक दृढ झाले. त्यामुळे भारतात परतल्यानंतर गांधी गोखल्यांच्या भारत सेवक समाजाचे सदस्य झाले आणि त्यांच्याच सल्ल्याप्रमाणे त्यांनी भारतातील सामाजिक आणि राजकीय वास्तव समजून घेण्यासाठी भारतभर दौरा केला. १९१६ साली त्यांची ही यात्रा संपन्न झाली. त्यानंतर ४ फेब्रुवारीस बनारस हिंदू विद्यापीठाच्या उद्‌घाटनप्रसंगी गांधींनी आपल्या भाषणातून एका नव्या पर्वाच्या नांदीची घोषणा केली. ते म्हणाले, “जर आपल्याला स्वराज्य खरोखरच पाहिजे असेल, तर ते आपणाला घ्यावे लागेल; ते मागून कधीही मिळणार नाही.” गांधींना अभिप्रेत असलेला स्वराज्य-प्राप्तीचा मार्ग अहिंसक सत्याग्रहाचा होता.

१९१७ व १९१८ या काळात महात्मा गांधींनी भारतातील आपल्या सत्याग्रहाच्या प्रयोगाची सुरुवात केली. चंपारण्यामधील शेतकऱ्यांना आपल्या जमिनीतील ३/२० या भागात निळीची लागवड करण्याचे बंधन युरोपियन मळेवाल्यांनी घातले होते. या पद्धतीला तीन कठीया असे संबोधले जात असे. परंतु जर्मनीमध्ये कृत्रिम निळीचे उत्पादन होऊ लागल्याने येथील मळेवाले अडचणीत आले आणि त्यांनी शेतकऱ्यांकडून अन्याय्यपणे सारा वसूल करण्यास प्रारंभ केला. शेतकऱ्यांना न्याय मिळवून देण्यासाठी गांधींनी अहिंसक लढा दिला. परिणामी तीन कठिया पद्धत बंद करण्यात आली. तसेच मळेवाल्यांनी शेतकऱ्यांकडून अन्यायाने वसूल केलेल्या साऱ्यातील काही भागही त्यांना परत मिळाला. चंपारण्याप्रमाणेच खेडा जिल्ह्यातील शेतकऱ्यांना न्याय मिळवून देण्यास गांधींचे सत्याग्रहतंत्र उपयुक्त ठरले. तेथे दुष्काळामुळे शेतीचे मोठे नुकसान झाले होते, परंतु शेतसारा मात्र भरावा लागत होता. अशा परिस्थितीत जिल्ह्यातील शेत-सारावसुली तहकूब करण्यासाठी गांधींच्या मार्गदर्शनाखाली तेथे अहिंसक सत्याग्रह सुरू झाला आणि त्यास यशही आले. शेतकरीप्रश्नाबरोबरच गांधींनी अहमदाबादमधील कामगारांचा व मालकांचा तंटा सत्याग्रहाच्या माध्यमातून संपुष्टात आणला. चंपारण्य, खेडा आणि अहमदाबाद येथील अहिंसक सत्याग्रहाने महात्मा गांधींचे वेगळेपण अधोरेखित केले. शिवाय या लढ्यांनी सर्वसामान्यांच्या मनात गांधींबद्दलचा आदर आणि विश्वास वाढला. गांधी सर्वसामान्यांचे नेते म्हणून ओळखले जाऊ लागले.

### रौलेट ॲक्ट आणि जालियनवाला बाग हत्याकांड

गांधींना लोकांचा उदंड प्रतिसाद मिळू लागला, म्हणून त्यांनी १९१९ मध्ये रौलेट विधेयकाच्या विरोधात राष्ट्रव्यापी आंदोलन सुरू केले. ज्या समितीने हे विधेयक सुचविले होते, त्याचे अध्यक्ष रौलेट होते. त्यामुळे हे विधेयक रौलेट विधेयक म्हणून ओळखले जाऊ लागले. या विधेयकाद्वारे ब्रिटिश सरकार अराजक माजवणाऱ्या क्रांति-कारकांच्या कारवायांना आळा घालण्याच्या नावाखाली भारतीय नागरिकांच्या नागरी हक्कांची गळचेपी करणार, हे स्पष्ट दिसू लागले. वास्तविक पाहता पहिल्या महा-युद्धाच्या समाप्तीनंतर ब्रिटिश सरकार भारतीयांना अधिक घटनात्मक सवलती देईल, अशी अपेक्षा होती. परंतु त्या उलट त्याने रौलेट विधेयक अथवा ‘काळे विधेयक’ जनतेवर लादण्याचा प्रयत्न सुरू केला. यास विरोध करण्यासाठी गांधींनी सत्याग्रह सुरू केला. त्यासाठी ‘सत्या-ग्रह सभेची’ स्थापना करण्यात आली. होमरूलचे अनेक कार्यकर्ते त्यात सहभागी झाले. उपवास, प्रार्थना यांबरोबरच राष्ट्रव्यापी हरताळ करण्याचे निश्चित झाले. ३० मार्च ही तारीख त्यासाठी निश्चित करण्यात आली. परंतु नंतर त्यात बदल करून ६ एप्रिल ही तारीख ठरविण्यात

आली, परंतु तारखेतील बदल लवकर न कळल्यामुळे उत्तर भारतात ३० मार्चलाच हरताळ पाळण्यात आला. तर इतरत्र ४ एप्रिल राष्ट्रीय सुतकदिन म्हणून पाळण्यात आला. ठिकठिकाणी झालेल्या भाषणांमधून इंग्रजांविषयी द्वेष व संताप व्यक्त करण्यात आला. काही ठिकाणी हिंसक घटनाही घडल्या. त्यामुळे गांधी अस्वस्थ झाले, कारण गांधींच्या सत्याग्रहाच्या कल्पनेशी हे सुसंगत नव्हते.

पंजाबमधील परिस्थिती या आंदोलनाच्या काळात अधिक हिंसक होऊ लागली होती. पहिल्या महायुद्धानंतर आलेली मंदी आणि युद्धकाळात बळजबरीने झालेली सैन्यभरती यांमुळे तेथे असंतोष अधिक होता. गांधींनी पंजाबला जाण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांना मुंबईतच अटक करण्यात आली. गांधींच्या अटकेच्या परिणामी काही ठिकाणी आंदोलनाने अधिक हिंसक वळण घेतले. पंजाबमध्ये १० एप्रिल रोजी सत्यपाल व किचलू या दोन नेत्यांना अटक करण्यात आली. त्यांच्या निषेधार्थ अमृतसरमध्ये हरताळ पाळण्यात आला आणि या दोघांच्या सुटकेची मागणी करण्यात आली. या निःशस्त्र जमावावर गोळीबार झाल्याने जमावाने पोस्ट ऑफिस, टाउन हॉल यांवर हल्ला चढवला. टेलिफोनच्या तारा कापल्या, युरोपियन स्त्रियांना मारहाण केली. पंजाबमधील चिघळलेल्या परिस्थितीवर नियंत्रण आणण्यासाठी ब्रिटिश सरकारने जनरल डायर यांच्याकडे शहराची सूत्रे दिली. त्यांनी सभा, मिरवणुकीस बंदीहुकूम जारी केला. परंतु त्या हुकमास न जुमानता मोठ्या संख्येने लोक १३ एप्रिल, बैसाखीदिवशी जालियनवाला बाग येथे एका सभेसाठी जमले. बैसाखी उत्सवानिमित्त आसपासच्या गावांमधून अमृतसरला आलेले लोकही या सभेसाठी गोळा झाले. बंदीहुकूम मोडून सभा भरविल्यामुळे जनरल डायर यांनी कोणतीही पूर्वसूचना न देता जमलेल्या २५ ते ३० हजार लोकांवर बेछूट गोळीबार केला. जवळपास १० मिनिटे बंदुकीच्या फैरी झडत होत्या. सरकारी आकडेवारीनुसार ३७९ लोक मारले गेले. मात्र जवळपास ५३० ते १५०० लोक मारले गेल्याचा अंदाज प्रत्यक्षदर्शींनी वर्तविला. जालियनवाला बाग हत्याकांडाने संपूर्ण देश उद्विग्न झाला. पंजाबमध्ये मार्शल लॉ लागू करून तेथील लोकांची दडपशाही ब्रिटिश सरकारने सुरूच ठेवली. रौलेट सत्याग्रहाला लागलेल्या हिंसक वळणामुळे गांधींनी अखेर हे आंदोलन १८ एप्रिलला मागे घेतले. अर्थात त्यांचा अहिंसक सत्याग्रहावरचा दृढ विश्वास मात्र कोठेही कमी झाला नाही.

**खिलाफत चळवळ**

१९१९ हे वर्ष भारतासाठी अनेक राजकीय घडामोडी घेऊन आले. दुसरे महायुद्ध नुकतेच संपले होते. युद्धकाळात भारतीय मुसलमानांचा पाठिंबा मिळविण्यासाठी ब्रिटिश सरकारने त्यांना तुर्कस्थानच्या बादशहाला आदराची वागणूक दिली जाईल, असे आश्वासन दिले होते. परंतु हे आश्वासन ब्रिटिशांनी पाळले नाही व तुर्कस्थानच्या बादशहाला पदभ्रष्ट केले. तुर्कस्थानचा बादशहा हा खलिफा म्हणून भारतीय मुसलमानांना आदरणीय होता. खलिफाला पदभ्रष्ट केल्यामुळे भारतीय मुस्लिम समाजात ब्रिटिश सरकारबद्दल असंतोष निर्माण झाला.

महात्मा गांधींना खिलाफतीचा प्रश्न फार महत्त्वाचा वाटत होता. या प्रश्नाबाबत हिंदूंनी मुसलमानांचा निर्धाराने पाठपुरावा केला, तर हिंदू–मुस्लिम ऐक्य घडवून आणणे शक्य होईल, अशी गांधींची भूमिका होती. व्हाइसरॉय चेम्सफर्ड यांना लिहिलेल्या पत्रात गांधींनी खिलाफतीसंबंधी भारतीय मुसलमानांच्या भावना त्यांच्यापर्यंत पोचविल्या होत्या. काँग्रेसनेही खिलाफतीचा प्रश्न आपल्या व्यासपीठावर मांडला. १९१८ च्या अखेरीस मदनमोहन मालवीय यांच्या अध्यक्षतेखाली काँग्रेसचे अधिवेशन भरले, त्यामध्ये अध्यक्ष मालवीय यांनी खिलाफतीच्या प्रश्नाची दखल घेतली. तसेच स्वागत समितीचे अध्यक्ष हकीम अजमल खान यांनीही खिलाफतीबद्दलच्या मुस्लिमांच्या तीव्र भावना व्यक्त केल्या. भारतीय मुस्लिम लीगनेही खिलाफतीसंबंधी मुस्लिमांच्या तीव्र भावना ब्रिटिश सरकारला सांगण्यासाठी ब्रिटनला एक शिष्टमंडळ पाठविले. परंतु त्या वेळी मुस्लिम लीगची ताकद अल्प होती. शिवाय लीग खिलाफतीसाठी संघर्ष करण्याच्या मनःस्थितीत नव्हते. अशा परिस्थितीत केवळ खिलाफतीच्या प्रश्नावर लक्ष केंद्रित करणारी एखादी नवी संघटना असावी, असे काहींना वाटू लागले. यातूनच २० मार्च १९१९ रोजी मुंबईत भरलेल्या मुसलमानांच्या जाहीर सभेत खिलाफत समितीची स्थापना करण्यात आली. तिच्या ठिकठिकाणी शाखा

काढण्यात आल्या. खिलाफतीसाठी केवळ अर्जविनंत्या करून चालणार नाही, त्यासाठी आंदोलन केले पाहिजे हे ओळखून १७ ऑक्टोबर १९१९ हा दिवस खिलाफत दिवस पाळण्याचे ठरविण्यात आले. त्या दिवशी प्रार्थना करण्यात आल्या, उपवास केले गेले, हरताळ पाळला गेला, जाहीर सभांमधून खिलाफतीला सर्वांचा, विशेषतः हिंदूंचा पाठिंबा मागण्यात आला. या जाहीर सभांना हजारोंनी गर्दी केली.

खिलाफत दिवसास मिळालेला पाठिंबा लक्षात घेऊन २३ व २४ नोव्हेंबर १९१९ ला अखिल भारतीय खिलाफत समितीने परिषद भरविण्याचे ठरविले. त्यात महात्मा गांधीही विशेष निमंत्रित म्हणून सहभागी झाले. महात्मा गांधी खिलाफतीचा प्रश्न हा केवळ मुसलमानांचा नव्हे, तर हिंदूंचाही प्रश्न आहे, असे मानत होते. परिषदेमध्ये बोलताना महात्मा गांधींनी स्वामी श्रद्धानंदांसारख्यांच्या भूमिकेचा प्रतिवाद करत असे म्हटले की, "खिलाफतीच्या प्रश्नासंबंधी कोणतीही सौदेबाजी केली जाऊ नये." स्वामी श्रद्धानंद वगैरे मंडळी अशी भूमिका घेत होती, की जर खिलाफतीच्या प्रश्नावर हिंदूंचे सहकार्य हवे असेल, तर "गोवधबंदीचा ठराव मुस्लिम लीगने करावा." गांधी मात्र असे मानीत होते की मुसलमानांनी स्वयंस्फूर्तीने गोवधबंदी मान्य केली, तर ती मान्य करावी.

१९१९ च्या डिसेंबर महिन्यात अमृतसरला काँग्रेसचे अधिवेशन भरले. त्यामध्ये खिलाफतीसंबंधी ठराव मंजूर करण्यात आला. भारतातील मुस्लिमांच्या न्याय्य भावनांचा आदर राखून ब्रिटनच्या पंतप्रधानांनी दिलेले वचन पाळावे व तुर्कस्थानचा प्रश्न सोडवावा, अशी विनंती ठरावाद्वारे करण्यात आली. खिलाफतीच्या प्रश्नावर अशा रीतीने सर्व बाजूंनी प्रयत्न सुरू होते. मार्च १९२० मध्ये खिलाफत परिषदेतर्फे एक शिष्टमंडळही ब्रिटनला पाठविण्यात आले. परंतु त्यासही यश आले नाही. अखेरीस खिलाफत परिषदेने असहकाराचे आंदोलन सुरू केले. परंतु हे आंदोलन गांधींच्या असहकार तत्त्वाशी विसंगत होत असल्याचे निदर्शनाला आल्यानंतर स्वतः महात्मा गांधींनी असहकाराचा चार टप्प्यांचा कार्यक्रम घोषित केला. प्रथम पदव्यांचा त्याग करणे, नंतर सरकारी नोकऱ्यांचा राजीनामा देणे, नंतर पोलिस व लष्करातून राजीनामे देऊन बाहेर पडणे व कर भरण्यास नकार देणे. महात्मा गांधींचा हा कार्यक्रम खिलाफत परिषदेने स्वीकारला आणि पुढे होणाऱ्या राष्ट्रव्यापी असहकार आंदोलनाची ही नांदी ठरली.

### असहकार आंदोलनाची पार्श्वभूमी

पहिल्या महायुद्धामुळे भारतीय समाजाला आर्थिक अरिष्टाला तोंड द्यावे लागले होते. वाढती महागाई, अपुरा धान्यपुरवठा, गरजेच्या वस्तूंची कमतरता यांमुळे मध्यम आणि कनिष्ठ मध्यम वर्गामध्ये असंतोष निर्माण झाला होता. त्यातच दुष्काळ आणि रोगराईने लोक त्रस्त झाले होते. होमरूल चळवळीने सर्व सामान्याच्या अपेक्षा वाढल्या होत्या. परंतु जालियनवाला बाग हत्याकांड व त्यासंबंधीच्या हंटर आयोगाच्या शिफारशींनी भारतीयांची मने उद्विग्न झाली होती. जालियनवाला बाग हत्याकांडाची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या हंटर आयोगाने हत्याकांडाचे समर्थन करून त्यास जबाबदार असणाऱ्या जनरल डायर-सारख्या अधिकाऱ्याची पाठ थोपटली. ब्रिटिश सरकारने अशा प्रकारे भारतीयांच्या जखमेला मीठ चोळण्याचाच प्रयत्न केला होता. शिवाय घटनात्मक मार्गाने भारतीयांच्या पदरात काही पडेल, ही आशा धूसर झाली होती. १९१९ साली अमलात आलेल्या मॉन्टेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा कायद्यानेही भारतीयांच्या पदरात निराशाच आली. या कायद्याने जबाबदारीच्या तत्त्वाला हरताळ फासत भारतातील सरकार येथील मध्यवर्ती कायदे मंडळाला नव्हे, तर ब्रिटनमधील संसदेला जबाबदार राहील, अशी तरतूद केली होती. शिवाय प्रांतिक पातळीवर राखीव आणि सोपीव अशी विभागणी करून, राखीव खात्यांचा कारभार एक युरोपियन व एक भारतीय यांच्या मदतीने गव्हर्नरकडे सुपूर्द करण्यात आला. तर सोपीव खाती निवडून आलेल्या प्रतिनिधींकडे सोपविण्यात आली. विशेष म्हणजे अत्यंत महत्त्वाची खाती राखीव खात्यांमध्ये समाविष्ट करण्यात आली. या कायद्यामुळे भारतीयांना गाजर दाखविण्या-पलीकडे काही केले नाही. काँग्रेसमधील जहाल गटाने या कायद्याला विरोध केला. टिळकांनी तर 'उजाडले, पण सूर्य कोठे आहे?' अशी कडवट टीका केली. मवाळांचे मात्र याबाबत मतभेद होते.

एकूणच १९१९ पर्यंतच्या घटनाक्रमांची परिणती

एका अहिंसक वादळात होणार, अशी चिन्हे स्पष्ट दिसू लागली. १ ऑगस्ट १९२० ला लोकमान्य टिळकांचा मृत्यू झाला आणि राष्ट्रीय चळवळीची सूत्रे महात्मा गांधींकडे गेली. त्यांचा मार्ग अहिंसक, असहकाराचा असणार हे स्पष्ट होते. गांधींनी कैसर–ए–हिंद पारितोषिक सरकारला परत करून असहकाराच्या चळवळीस सुरुवात केली.

भारतीयांना उद्विग्न करणाऱ्या हंटर आयोगाच्या शिफारशी २६ मे १९२० रोजी प्रसिद्ध झाल्या आणि ३०, ३१ मे १९२० रोजी बनारसला अखिल भारतीय काँग्रेस समितीची बैठक झाली. असहकार कार्यक्रमाबाबत प्रांतिक काँग्रेस समित्यांची मते घ्यावीत आणि १५ सप्टेंबर-पूर्वी असहकार चळवळ सुरू करण्यासंबंधीचा निर्णय घेण्यासंबंधी काँग्रेसचे खास अधिवेशन घेतले जावे, असे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे ४ सप्टेंबर १९२० ला कलकत्त्याला लाला लजपतरायांच्या अध्यक्षतेखाली काँग्रेसचे खास अधिवेशन घेण्यात आले. परंतु या अधिवेशनात गांधींच्या 'असहकार' व बहिष्कार या तत्त्वांना काहीसा विरोध होता. सी. आर. दास, बिपीनचंद्र पाल इत्यादींना गांधींचा कार्यक्रम पूर्णतः मान्य नव्हता. विशेषतः प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका तोंडावर आल्या असताना बहिष्कार घालणे त्यांना पटत नव्हते. परंतु जेव्हा १९२० च्या डिसेंबरअखेरीस नागपूरला भरलेल्या काँग्रेस अधिवेशनात असहकारासंबंधीच्या ठरावावर शिक्कामोर्तब होण्यासाठी तो सादर केला तेव्हा असहकार आंदोलनास असणारा विरोध बराचसा मावळला; कारण त्यापूर्वीच प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका पार पडल्या होत्या.

**काँग्रेसचे नागपूर अधिवेशन (१९२०)**

नागपूरचे काँग्रेस अधिवेशन म्हणजे काँग्रेसच्या इतिहासातील एक महत्त्वाचा टप्पा होता. या अधिवेशनामुळे काँग्रेसच्या व राष्ट्रीय चळवळीच्या इतिहासाला एक वेगळे वळण मिळाले. या अधिवेशनास हजारोंच्या संख्येने प्रतिनिधी हजर होते. या अधिवेशनात असहकार, बहिष्कार या ठरावांवर शिक्कामोर्तब झाले आणि महात्मा गांधींनी असे आश्वासन दिले, की असहकाराचा कार्यक्रम योग्य रीतीने राबविल्यास एका वर्षात स्वराज्यप्राप्ती शक्य आहे.

स्वराज्याच्या परिपूर्तीसाठी नागपूर अधिवेशनात काँग्रेसमध्ये संघटनात्मक बदल करण्याचा निर्णय घेण्यात आला. काँग्रेसचे कार्य सातत्याने व स्थायी स्वरूपात व्हावे, यासाठी १५ जणांची कार्यकारी समिती (working committee) तयार करण्याचा निर्णय घेण्यात आला. काँग्रेसच्या २१ प्रांतिक समित्या असाव्यात व त्यांची रचना भाषेच्या आधारावर केली जावी, असे ठरले. अशा पद्धतीने प्रांतिक समित्या केल्यामुळे त्या त्या प्रांतातील लोकांशी संवाद साधणे सुलभ जाईल, अशी त्यामागची भूमिका होती. जिल्हा, तालुका अथवा स्थानिक समिती अशी उतरत्या श्रेणीची रचना काँग्रेसमधील संघटनेमध्ये स्वीकारण्यात आली. तळागाळातील लोकांना काँग्रेसमध्ये सहभागी होता यावे, यासाठी वार्षिक सभासद वर्गणी अवघी दोन आणे ठेवण्यात आली. पूर्वीच्या बव्हंशी शिथिल संघटनेऐवजी शिस्तबद्ध अशी लोकांच्या पाठिंब्यावर आधारलेली संघटना बांधण्याचे काम हाती घेण्यात आले. याचे प्रमुख शिल्पकार होते महात्मा गांधी.

**असहकार चळवळ (१९२०-२२)**

काँग्रेसने असहकारासंबंधी ठराव केल्यानंतर देशभर असहकार चळवळीने जोर धरला. अलीबंधूंच्या (खिलाफत चळवळीचे महत्त्वाचे नेते) बरोबर महात्मा गांधींनी देशभर दौरा करून अनेक सभा घेतल्या, कार्यकर्त्यांबरोबर भेटीगाठी केल्या. चळवळीच्या पहिल्याच महिन्यात हजारो विद्यार्थ्यांनी सरकारी शाळा, महाविद्यालयांमधून बाहेर पडून राष्ट्रीय शाळा, महाविद्यालयांमध्ये प्रवेश घेतला. बंगाल, पंजाब प्रांतांमधील विद्यार्थ्यांनी यात आघाडी घेतली. आंदोलनाचा भाग म्हणून मोतीलाल नेहरू, सी. आर. दास, सैफुद्दिन किचलू, वल्लभभाई पटेल, सी. राजगोपालचारी इत्यादी नामांकित वकिलांनी आपली वकिली सोडली. देशभराच्या वकिलांना त्यांचे उदाहरण प्रेरणादायी ठरले. परदेशी कपड्यांचा बहिष्कार हा या आंदोलनातील सर्वांत प्रभावी कार्यक्रम ठरला, त्याचबरोबर दारूदुकानांमध्ये जाऊन पिकेटिंग करण्यातही कार्यकर्त्यांना यश आले. त्यातून सरकारचा महसूल इतका घसरला, की त्यांना विदेशी दारूचा खप वाढविण्यासाठी जाहिरात करावी लागली. आंदोलनकाळात काँग्रेसच्या सभासदांची संख्या वाढविण्या-

साठी विशेष प्रयत्न केले गेले. टिळक स्वराज्य निधीला लोकांनी भरभरून पैसे दिले. टिळकांच्या मृत्यूनंतर स्वराज्याच्या कार्यासाठी निधी उपलब्ध व्हावा, यासाठी एक कोटी रुपयांच्या 'टिळक स्वराज्य निधी'ची संकल्पना पुढे आली होती. चरखा व खादीला लोकप्रियता मिळू लागली. मदुराई येथील सभेत जेव्हा एका विद्यार्थ्याने खादी महाग असते अशी तक्रार केली, तेव्हा गांधींनी कमी कपडे वापरणे हा त्यावरील उपाय असू शकतो, असे सुचविले. एवढेच नाही तर गांधींनी स्वतः कुडत्याचा त्याग करून केवळ एक आखूड धोतर नेसावयास प्रारंभ केला व आयुष्यभर तोच त्यांचा पेहराव झाला.

याच दरम्यान अखिल भारतीय खिलाफत परिषदेच्या कराची येथील बैठकीत महंमद अलींनी असे जाहीर केले, की "मुस्लिमांनी ब्रिटिश लष्करामध्ये काम करणे हे धार्मिक दृष्ट्या बेकायदेशीर आहे." अलींची ही घोषणा ब्रिटिश सरकारला दिलेले एक आव्हानच होते. त्यापाठोपाठ १७ नोव्हेंबर १९२१ ला प्रिन्स ऑफ वेल्सचा भारत दौरा सुरू झाला, तेव्हा भारतीयांनी हरताळ पाळून मोकळे रस्ते आणि बंद दुकानांनी त्यांचे स्वागत केले. अशा रीतीने ब्रिटिश सरकारला सर्व बाजूंनी जेरीस आणल्यामुळे आंदोलकांचा जोर वाढला. सुरुवातीच्या काळात जेव्हा असहकार आंदोलन सुरू झाले, तेव्हा ब्रिटिश सरकारने हे आंदोलन फारसे गांभीर्याने घेतले नव्हते. परंतु १ डिसेंबर १९२१ पर्यंत परिस्थिती हाताबाहेर जात असल्याचे लक्षात आल्याने ब्रिटिश सरकारने आंदोलनाविषयी धोरण बदलले. चळवळ दडपण्यासाठी नेत्यांची धरपकड सुरू झाली. गांधी वगळता सर्व नेत्यांना अटक करण्यात आली. जवळपास ३०,००० लोकांना तुरुंगात डांबण्यात आले. जाहीर सभांवर बंदी घालण्यात आली, वृत्तपत्रांची गळचेपी सुरू झाली, काँग्रेस व खिलाफतीच्या कार्यकर्त्यांवर धाडी घालण्यात आल्या. चळवळ जसजशी दडपली जाऊ लागली, तसतसा सामुदायिक सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याबाबत महात्मा गांधींवर दबाव वाढू लागला. यासंबंधीचा निर्णय घेण्याचा सर्वाधिकार डिसेंबर १९२१ च्या अहमदाबादच्या अधिवेशनात महात्मा गांधींना देण्यात आला होताच. त्यानुसार बार्डोली तालुक्यात सर्वप्रथम सामुदायिक सविनय कायदेभंग करण्याचा निर्णय २९ जानेवारी १९२२ ला घेण्यात आला. त्यासंबंधीचा इशाराही महात्मा गांधींनी व्हाईसरॉय लॉर्ड रिडिंग यांना कळविला. परंतु व्हाईसरॉयने सर्व मागण्या फेटाळल्यामुळे सामुदायिक कायदेभंगाची चळवळ सुरू करण्यावाचून गांधींना कोणतेही गत्यंतर नव्हते, त्याच वेळी उत्तर प्रदेशातील गोरखपूर जिल्ह्यातील चौरीचौरा येथे हिंसक घटना घडली. काँग्रेस व खिलाफतने काढलेल्या मिरवणुकीवर पोलिसांकडून गोळीबार झाला. त्यास प्रत्युत्तर म्हणून पोलिसांवरच हल्ला चढविण्यात आला. बचावासाठी सर्व पोलिस पोलिसचौकीत लपून बसले, तेव्हा जमावाने पोलिसचौकीच पेटविली. त्यात बावीस पोलिस जिवंत जाळले गेले. या हिंसक उद्रेकाने गांधी सुन्न झाले. आणि त्यांनी काँग्रेस कार्यकारणीची तातडीने बैठक बोलावून त्यात सविनय कायदेभंगाची चळवळ स्थगित करण्याचा निर्णय घेतला. त्यांच्या आग्रहामुळे या निर्णयाला काँग्रेस कार्यकारी समितीने मान्यता दिली आणि १२ फेब्रुवारी १९९९ ला असहकार चळवळ समाप्त झाली.

### स्वराज्य पक्ष आणि १९२३ ते १९२७ पर्यंतचा कालखंड

असहकार चळवळीला पूर्णविराम मिळाला. परंतु तिने ब्रिटिश सरकारविरोधात असंतोष पसरविला, या कारणासाठी महात्मा गांधींना ६ वर्षे तुरुंगवासाची शिक्षा सुनावण्यात आली. त्याच्या परिणामी कार्यकर्त्यांचे मनोधैर्य खचले आणि चळवळीला स्थितिशीलता येण्याची शक्यता निर्माण झाली. भारतीयांची ब्रिटिशविरोधी भावना जागृत ठेवण्यासाठी चित्तरंजन दास, मोतीलाल नेहरू इत्यादी नेत्यांनी एक नवीन पर्याय मांडला. "कायदेमंडळावरील बहिष्कार मागे घेऊन त्यामध्ये प्रवेश करावा व कायदेमंडळाच्या कामकाजात अडथळे आणावेत, तसेच ब्रिटिशांच्या संसदीय लोकशाहीबद्दलच्या निष्ठेचे पितळ उघडे पडावे." असा तो पर्याय होता. कायदेमंडळाच्या निवडणुकीत काँग्रेस सहभागी झाली नाही तरी काँग्रेसशिवाय कायदेमंडळाचे काम चालूच राहील, त्यामुळे काँग्रेस कमकुवत होऊन विरोधी गट प्रभावी होतील. तसेच याद्वारे असहकाराच्या चळवळीला बळ मिळेल, असे त्यांचे मत होते. डिसेंबर १९२२ ला गया येथील काँग्रेस अधिवेशनामध्ये त्यांनी त्यासंबंधीचा ठराव मांडला.

या अधिवेशनात दास अध्यक्ष तर मोतीलाल सचिव होते. परंतु १७४८ विरुद्ध ८९० अशा फरकाने ठराव फेटाळला गेला. दास व मोतीलाल यांनी आपापल्या पदांचे राजीनामे दिले आणि १ जानेवारी १९२३ रोजी त्यांनी काँग्रेस खिलाफत स्वराज्य पक्ष स्थापन केला. तोच पक्ष स्वराज्य पक्ष म्हणून ओळखला जाऊ लागला. स्वराज्य पक्षातील काँग्रेस कार्यकर्ते 'फेरवादी' तर कायदेमंडळावर बहिष्कार करणाऱ्यांना 'नाफेरवादी' म्हणून संबोधले जाऊ लागले. "संसदीय निवडणुकांमध्ये सहभागी झाल्यामुळे रचनात्मक कार्यक्रमाकडे दुर्लक्ष होईल; तसेच एकदा कायदेमंडळात प्रवेश झाला, की हळूहळू निर्वासित सदस्य सरकारला सहकार्य करू लागतील. त्यामुळे असहकाराच्या मूलतत्त्वाचा भंग होईल, अशी नाफेरवाद्यांची भूमिका होती."

फेरवादी आणि नाफेरवादी यांच्यातील संघर्षातून कदाचित पुन्हा काँग्रेसमध्ये दुफळी पडेल, अशी भीती अनेक काँग्रेसी कार्यकर्त्यांत होती. शिवाय कायदेमंडळातील प्रवेशापेक्षा व्यापक राष्ट्रीय चळवळीद्वारेच भारतीयांना आपल्या मागण्या पूर्ण करून घेता येतील, याची जाणीवही सर्वच काँग्रेस कार्यकर्त्यांना होती. आणि त्यासाठी एकजुटीची गरज आहे, हे ओळखूनच सप्टेंबर १९२३ च्या दिल्ली येथील खास अधिवेशनात काँग्रेसने फेरवाद्यांच्या विरोधातील सर्व प्रचार थांबविला आणि सर्व काँग्रेस कार्यकर्त्यांना निवडणुकीत मतदान करण्यास अथवा निवडणूक लढविण्यास परवानगी दिली.

५ फेब्रुवारी १९२४ ला प्रकृती ठीक नसल्यामुळे महात्मा गांधींची तुरुंगातून सुटका करण्यात आली. गांधी कायदेमंडळातील प्रवेशाच्या विरोधात होते; परंतु फेरवाद्यांवर प्रत्यक्ष टीका न करता गांधींनी त्यांना विश्वासात घेतले. त्यांच्या कौन्सिलमधील कामाची प्रशंसा केली. एवढेच नव्हे, तर जेव्हा स्वराज्य पक्षाच्या कार्यकर्त्यांच्या घराची झडती घेण्याची मोहीम ब्रिटिश सरकारने सुरू केली, तेव्हा गांधी त्यांच्या पाठीशी उभे राहिले. अंतिमतः फेरवादी–नाफेरवादी या प्रश्नावर कायमचा पडदा पाडण्यासाठी त्यांनी असा निर्णय घेतला, की स्वराज्य पक्ष काँग्रेसच्या वतीने कायदेमंडळात काम करेल आणि स्वराज्य पक्ष हा काँग्रेसचा अविभाज्य भाग असेल. या निर्णयावर डिसेंबर १९२४ सालच्या काँग्रेसच्या बेळगाव येथील अधिवेशनात शिक्कामोर्तब करण्यात आले. या अधिवेशनाचे स्वतः महात्मा गांधी अध्यक्ष होते.

१९२३ च्या निवडणुकीत स्वराज्य पक्ष सहभागी झाला आणि त्यास घवघवीत यश मिळाले. अनेक नगरपालिका व लोकल बोर्डांतही काँग्रेस कार्यकर्ते निवडून आले. कौन्सिलमध्ये स्वराज्य पक्षाच्या प्रतिनिधींनी सरकारला प्रामुख्याने तीन प्रश्नांवर जेरीस आणले. १) स्वराज्याच्या दिशेने घटनात्मक विकास, २) भारतीयांच्या नागरी हक्कांचे संरक्षण, राजकीय कैद्यांची सुटका आणि दडपणूक करणाऱ्या कायद्यांना स्थगिती, ३) भारतीय उद्योगधंद्यांचा विकास.

१९२६ सालच्या निवडणुकाही स्वराज्य पक्षाने लढविल्या; पण यावेळी पक्ष कमकुवत झाला होता. सी. आर. दास १९२५ मध्ये वारले होते, जमातवादी संघटनांचा प्रभाव वाढू लागला होता, आणि त्यांच्याकडून स्वराज्य पक्षावर अत्यंत कडवट टीका केली जाऊ लागली. त्यामुळेच १९२६ च्या निवडणुकीत त्यांना ४० जागाच मिळविता आल्या, तर प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकीत पक्षाला अनेक ठिकाणी हार पत्करावी लागली. पुढे १९२९ ला लाहोर अधिवेशनात काँग्रेसने संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव केला आणि १९३० ला सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू केली. तेव्हा अंतिमतः स्वराज्य पक्षाच्या कार्यकर्त्यांनी कायदेमंडळांना रामराम ठोकला. असहकार चळवळीनंतरच्या काळात दास व मोतीलाल नेहरू यांच्या नेतृत्वाखाली स्वराज्य पक्षाने मोलाची कामगिरी बजावली. पण नंतर त्यात फूट पडली; कारण मध्यप्रांतात काही नेत्यांनी सभेची पदे स्वीकारली. केळकरगट बाहेर पडला. दास व मोतीलाल नेहरू यांच्या मृत्यूनंतर हा पक्ष नेतृत्वहीन झाला.

### १९२० च्या दशकातील स्थित्यंतरे व चळवळी

महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने सुरू केलेल्या असहकार चळवळीचा अप्रत्यक्ष परिणाम म्हणून १९२० च्या दशकात अनेक चळवळी निर्माण झाल्या. असहकार आंदोलनांनी सर्व प्रकारच्या दडपशाहीला प्रतिकार करण्याची प्रेरणा भारतीयांत निर्माण केली. शिवाय नुकत्याच संपलेल्या महायुद्धामुळे सर्वसामान्यांचे, शेत-

कऱ्यांचे, कामगारांचे जीवन दु:सह्य झाले होते. विशेषत: ब्रिटिश सरकारचे शेतसाऱ्यासंबंधीचे धोरण शेतकऱ्यांचे कंबरडे मोडणारे होते.

अ) शेतकऱ्यांची आंदोलने

शेतकऱ्यांमधील असंतोष ठिकठिकाणी झालेल्या शेतकऱ्यांच्या संघटनांमधून, आंदोलनांमधून व्यक्त होऊ लागला. त्यामध्ये होमरूल लीग, खिलाफत चळवळ व असहकार चळवळीतील कार्यकर्त्यांनी मोठ्या प्रमाणात सहभाग घेतला, नेतृत्व केले. संयुक्त प्रांतात किसान सभांची स्थापना करण्यात आली. किसान सभेच्या ३३० शाखा स्थापन करून त्यांनी शेतकऱ्यांच्या प्रश्नांना वाचा फोडण्याचा प्रयत्न केला. किसान सभेच्या फैजाबादमध्ये झालेल्या सभेत जवळपास १ लाख शेतकरी जमा झाले होते.

केरळमधील मलबार प्रांतातही मापिलांनी जमीनदारांच्या दडपशाहीला विरोध करण्यास प्रारंभ केला. त्यांची बाजू मलबार जिल्हा काँग्रेस परिषदेने उचलून धरली. खिलाफत चळवळीनेही मापिलांना पाठिंबा दिला. महात्मा गांधी, शौकत अली, मौलाना आझाद यांच्या भेटीने मापिलांचे मनोधैर्य वाढले आणि जमीनदारांच्या आणि ब्रिटिश सरकारच्या दडपशाहीला त्यांचा प्रतिकार अधिक तीव्र झाला. परंतु दुर्दैवाने या चळवळीला जमातवादी रंग चढू लागला आणि ही चळवळ एकाकी पडू लागली. चळवळ हिंसक झाली. त्यात अनेक निरपराध लोक मारले गेले. ब्रिटिश सरकारने ही चळवळ निर्दयपणे दडपून टाकली. त्यातून मापिलांचे मनोधैर्य इतके खचले, की त्यानंतरच्या सर्व राजकीय चळवळींपासून ते लांब राहिले. पण या दंगलीमुळे हिंदुत्ववादी शक्तींना बळ मिळाले.

गुजरातमधील बार्डोली तालुक्यातील शेतकऱ्यांनी अन्याय्य शेतसाऱ्याच्या विरोधात जे आंदोलन केले, तेही काँग्रेसच्या असहकार चळवळीची अप्रत्यक्ष उत्पत्ती होती. शेतसारा न भरून ब्रिटिश सरकारला असहकार्य करण्याचे धोरण चळवळीचे नेते वल्लभभाई पटेल यांनी स्वीकारले. त्यासाठी बैठका, सभा घेण्यात आल्या. घरोघरी जाऊन लोकांना, विशेषत: स्त्रियांना संघटित करण्याचा प्रयत्न केला गेला. असहकार आंदोलनाला विरोध करणाऱ्यांवर सामाजिक बहिष्काराचे अस्त्र वापरण्यात आले. अंतिमत: व्हाईसरॉय आर्यविन यांच्या दबावामुळे मुंबईच्या गव्हर्नरनी चौकशी समिती नेमून अन्याय्य कर कमी केला.

अशा रीतीने भारतात ठिकठिकाणी शेतकऱ्यांची जी आंदोलने झाली. त्यांचे महत्त्व विशद करताना महात्मा गांधी म्हणाले, "बार्डोलीसारख्या लहानमोठ्या आंदोलनांमुळे स्वराज्य जवळ येईल. कदाचित प्रत्यक्ष राष्ट्रीय चळवळीपेक्षा ही लहानमोठी आंदोलनेच स्वराज्याचा मार्ग सुकर करतील."

ब) कामगारांची आंदोलने

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धात भारतात औद्योगिकीकरणाला हळूहळू सुरुवात झाली आणि त्यातून कामगारवर्ग उदयाला आला. १८७० व १८९० मध्ये कामगार संघटनांचाही उदय झाला. या संघटना कामगारांच्या काही मागण्यांचा पाठपुरावाही करू लागल्या. युरोपियन भांडवलदारांच्या कारखान्यांतील कामगारांच्या तक्रारी सोडविणे हे एक राष्ट्रीय कार्य आहे, असे समजून केसरी व मराठासारख्या वृत्तपत्रांनी त्यांची बाजू मांडली. स्वदेशी आंदोलनाच्या काळात कामगारवर्ग केवळ आपल्या आर्थिक प्रश्नांसाठीच संघर्ष करत होता असे नव्हे तर राजकीय चळवळींतही सहभागी होत होता. १९१५ ते १९२२ या कालावधीत भारतीय राष्ट्रीय चळवळ अधिक गतिमान झाली, त्यात कामगारही मोठ्या प्रमाणात सहभागी झाले. त्यांनी ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस (आयटक) या राष्ट्रीय स्वरूपाच्या कामगार संघटनेची स्थापना केली. लोकमान्य टिळकांनी तिच्या स्थापनेत महत्त्वाची भूमिका पार पाडली. लाला लजपतराय हे तिचे पहिले अध्यक्ष झाले. काँग्रेसमधील अनेक नेते-सी. आर. दास, सी. एफ अॅन्ड्रेज, सुभाषचंद्र बोस, जवाहरलाल नेहरु, सत्यमूर्ती आयटकच्या कामाशी जोडले गेले. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने १९२२ च्या गया येथील अधिवेशनात आयटकच्या स्थापनेचे स्वागत करून त्यास मदत करण्यासाठी काँग्रेसच्या महत्त्वाच्या नेत्यांची एक समितीही तयार केली. या नेत्यांनी भांडवलशाहीची सांगड साम्राज्यशाहीशी घालून सर्व कामगारांना साम्राज्यवादविरोधी लढ्यात सहभागी होण्याचे आवाहन केले. त्यास प्रतिसाद देऊन हजारो कामगार काँग्रेसच्या विविध आंदोलनांमध्ये सभागी झाले.

१९२७ नंतर काँग्रेसमध्ये डाव्या विचारसरणीचा प्रभाव वाढू लागला. तत्पूर्वी ठिकठिकाणी कम्युनिस्ट गटांनी 'कामकरी, शेतकरी पक्षांची (WPP)' स्थापना केली होती. एस. ए. डांगे, मुझफ्फर अहमद, पी. सी. जोशी, सोहन सिंग जोश इत्यादी त्यांचे नेतृत्व करत होते. या पक्षांना काँग्रेस संघटनेमध्ये आपला प्रभाव प्रस्थापित करण्यात लवकरच यश मिळाले. १९२८ पर्यंत त्यांचा प्रभाव फारच वाढला. विशेषतः गिरणी कामगारांच्या सहा महिन्यांच्या (एप्रिल–सप्टेंबर १९२८) संपानंतर कम्युनिस्ट नेतृत्वाखालील गिरणी कामगार संघाला महत्त्व प्राप्त झाले. या सर्वच कामगार संघटनांनी राष्ट्रीय आंदोलनात आपली भागीदारी देऊन त्यास बळकटी दिली.

ब) संस्थानी प्रजेच्या चळवळी

असहकार आंदोलनानंतर भारतभर राजकीय जागृती वाढत गेली आणि त्याचे लोण संस्थानी प्रदेशांतही जाऊन पोचले. विशेषतः १९१९ च्या कायद्यान्वये प्रांतिक सरकारातील सोपीव खात्यांचा कारभार लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हाती गेलेला पाहून संस्थानांतही जबाबदार राज्यपद्धती निर्माण करण्याच्या मागणीला चालना मिळण्याची शक्यता संस्थानिकांना दृष्टिआड करून चालणार नव्हते. या पार्श्वभूमीवर फेब्रुवारी १९२१ मध्ये नरेंद्रमंडळाची स्थापना करण्यात आली. संस्थानिकांच्या अंदाजाप्रमाणे अनेक संस्थानांमध्ये जबाबदार राज्यपद्धतीसाठी, संस्थानी प्रजेच्या राजकीय हक्कांसाठी प्रजापरिषदेच्या चळवळी सुरू झाल्या. एवढेच नव्हे, तर अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदही स्थापन करण्यात आली. १७ व १८ डिसेंबर १९२७ रोजी मुंबईत अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदेचे अधिवेशन भरले आणि भारतीय प्रजा परिषद चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली.

संस्थानी प्रजेच्या चळवळीबाबत भारतीय राष्ट्रीय काँग्रेसची भूमिका सर्वप्रथम १९२० मध्येच स्पष्ट करण्यात आली होती. नागपूर येथील काँग्रेस अधिवेशनात संस्थानिकांनी आपल्या प्रजेला जबाबदार राज्यपद्धती बहाल करावी, असा ठराव मंजूर करण्यात आला होता. संस्थानी प्रजेने आपल्या संस्थानांतील लढा स्वतः सुरू करावा, अशी काँग्रेसची भूमिका होती. प्रजा परिषदेच्या चळवळीतील कार्यकर्त्यांचा काँग्रेस नेत्यांशी अनौपचारिक संपर्क असला व काँग्रेसकडून त्यांना वैचारिक साथ मिळत असली, तरी काँग्रेसच्या बॅनरखाली संस्थानांत चळवळ होऊ नये, अशी काँग्रेसची धारणा होती.

क) जमातवादी संघटनांचे पुनरुज्जीवन

असहकार आंदोलनामुळे संपूर्ण देशभर एक जागृतीची लाट निर्माण झाली. परंतु त्याचबरोबर जमातवादी संघटनांचेही पुनरुज्जीवन झाले. वास्तविकतः काँग्रेसच्या नेतृत्वाखालील राष्ट्रीय चळवळ जसजशी विस्तारत गेली, तसतशी ब्रिटिशांच्या पायाखालील वाळू सरकू लागली. आपली भारतातील सत्ता टिकविण्यासाठी त्यांनी फोडा आणि झोडा या नीतीचा अवलंब केला. धार्मिक समूहांमधील तेढ वाढविणे हा त्याच नीतीचा भाग होता. त्यातूनच मुस्लिम लीगचाही जन्म झाला होता. १९०९ व १९१९च्या कायद्यांद्वारे ही नीती पुढे रेटण्यात आली होती.

फेब्रुवारी १९२२ मध्ये असहकाराचे आंदोलन स्थगित करण्यात आले. अचानक झालेल्या स्थगितीमुळे भारतीयांत काही प्रमाणात अस्वस्थता निर्माण झाली. या पार्श्वभूमीवर पूर्वाश्रमीच्या जमातवादी संघटनांचे पुनरुज्जीवन झाले, तर काही नवीन संघटना उदयाला आल्या. मुस्लिम लीगकडे उच्चवर्गीय मुस्लिमांचा ओघ सुरू झाला आणि ती संघटना अधिक जहाल झाली. १९२३ साली हिंदू महासभेचे पुनरुज्जीवन झाले. (१९१५ साली हिंदू महासभेची स्थापना झाली होती.) त्यांनी मुस्लिमविरोधी भावनांना खतपाणी घालून हिंदू राष्ट्र उभारणीचे उद्दिष्ट स्वीकारले. १९२० च्या दशकात जमातवादाच्या वाढत्या प्रभावामुळे हिंदू व मुसलमान अशा दोनही समुदायांत संशयाचे वातावरण निर्माण झाले. त्यातून हिंदूंमध्ये संघटन व शुद्धीचळवळ तर मुस्लिमांमध्ये तनझीम व तबलीग या चळवळी उदयाला आल्या. यातून दोन्ही समुदाय धर्माच्या आधारावर अधिक संघटित होऊ लागले.

जमातवादी संघटनांच्या वाढत्या प्रभावामुळे स्वाभाविकच सर्वत्र जमातवादी दंगली पेटू लागल्या. या दंगली घडवून आणण्यामध्ये ब्रिटिशांचा हात होता. नागपुरात १९२३ सालापासून जमातवादी दंगली सुरू झाल्या होत्या. त्यांच्या पार्श्वभूमीवर १९२५ मध्ये दसऱ्याच्या दिवशी राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना झाली. हिंदूंचे संरक्षण व संघटन करणे, चारित्र्यसंवर्धन करणे हे संघाने आपले

अनुक्रमणिका

उद्दिष्ट मानले असले, तरी त्यांचा प्रत्यक्ष व्यवहार जमातवादाला खतपाणी घालणाराच ठरला.

ड) ब्राह्मणेतर चळवळ

पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर भारतात राजकीय हालचाली वेगाने सुरू झाल्या. टिळक आणि ॲनी बेझंट यांच्या नेतृत्वाखाली होमरूलची चळवळ सुरू झाली. परंतु होमरूल चळवळ ही ब्राह्मणी वर्चस्व पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी चाललेली चळवळ आहे, अशी धारणा मुंबई व मद्रास प्रांतांतील ब्राह्मणेतरांची झाली होती. ब्राह्मणांच्या या वर्चस्वाला आव्हान देण्यासाठी १९१७ साली तेथे साउथ इंडियन लिबरेशन फेडरेशनची स्थापना करण्यात आली. ब्राह्मणेतरांमध्ये शिक्षणाचा प्रसार करणे, त्यांच्यासाठी शाळा, वसतिगृहे काढणे, त्यांना नोकऱ्या मिळवून देणे. त्यांचे कायदेमंडळातील, स्थानिक स्वराज्य संस्थांमधील प्रमाण वाढविणे या उद्देशाने ही संघटना स्थापन करण्यात आली. त्यांनी सुरू केलेल्या "जस्टिस" या इंग्रजी दैनिकामुळे हा पक्ष 'जस्टिस पार्टी' या नावानेच ओळखला जाऊ लागला. काँग्रेसमध्ये ब्राह्मणांचे वर्चस्व असल्यामुळे तिच्यापासून अलग राहून तिला विरोध करणे, होमरूल चळवळीस विरोध करणे, असे धोरण जस्टिस पक्षाने स्वीकारले. त्यांनी मॉन्टेग्यूला सादर केलेल्या निवेदनात भारतीयांना होमरूल देण्याची वेळ अद्याप आलेली नाही; जर होमरूल किंवा स्वराज्य दिले गेले, तर मूठभर उच्चवर्णीयांच्या हाती राजकीय सत्ता जाईल आणि सर्वसामान्यांच्या हालअपेष्टा होतील असा इशारा देण्यात आला.

मद्रासप्रमाणे मुंबई प्रांतातही ब्राह्मणेतर चळवळ सुरू झाली. ब्राह्मणांच्या वर्चस्वाला आव्हान देऊन धार्मिक व सामाजिक सुधारणांचा आग्रह धरणारी सत्यशोधक चळवळ १९ व्या शतकात उदयाला आली होती. जोतीबा फुल्यांच्या निधनानंतरही ती काही काळ सुरू राहिली. परंतु १९१० च्या सुमाराला ती थंडावली. १९१३ नंतर कोल्हापूरच्या छ. शाहूंनी या चळवळीला राजाश्रय दिला आणि तिला नवसंजीवनी मिळाली. सत्यशोधक चळवळीची अधिवेशने नियमित भरू लागली. परंतु फुल्यांनी सुरू केलेल्या सत्यशोधक चळवळीपेक्षा ही पुनरुज्जीवित झालेली चळवळ भिन्न होती. फुल्यांचा ब्राह्मणजातीला नव्हे, तर ब्राह्मण्याला विरोध होता. नवी चळवळ ब्राह्मणांना, त्यांच्या राजकीय वर्चस्वाला विरोध करू लागली. सत्यशोधक चळवळीस ब्राह्मणांचे वावडे नव्हते; परंतु ब्राह्मणेतर चळवळीत मात्र ब्राह्मण वर्ज्य होते. सर्व सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीत सामील झाले, तरी ब्राह्मणेतर चळवळीत सामील झालेले सर्वजण सत्यशोधक विचारसरणीचे नव्हते. सत्यशोधक चळवळीत मराठे, लिंगायत, जैन, कायस्थ या जातींच्या लोकांचा सहभाग कमी होता; तर ब्राह्मणेतर चळवळीत या जाती आघाडीवर होत्या.

काँग्रेसने सुरू केलेल्या होमरूल चळवळीत ब्राह्मणांचे वर्चस्व आहे, अशी ब्राह्मणेतर चळवळीच्या नेत्यांची धारणा होती, म्हणून त्यांनी होमरूल चळवळीस विरोध केला आणि ब्राह्मणेतरांची नवी संघटना डेक्कन रयत स्थापन केली. ब्राह्मणेतराच्या प्रश्नांना वाचा फोडण्यासाठी डेक्कन रयत, जागृतीसारखी वृत्तपत्रेही सुरू केली. मोन्टेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा कायद्यासाठी जेव्हा भारतातील विविध गटांशी चर्चा सुरू झाल्या, तेव्हा ब्राह्मणेतर चळवळीनेही ब्राह्मणेतरांसाठी स्वतंत्र प्रतिनिधी किंवा स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली. काँग्रेसने असहकाराचे आंदोलन सुरू केले, तेव्हा ब्राह्मणेतर त्यापासून अलिप्त राहिले. ब्राह्मणेतर चळवळीचे पाठीराखे छत्रपती शाहू महाराजांचे १९२२ मध्ये निधन झाले. त्यानंतर काही काळ ब्राह्मणेतर पक्षाला अवकळा आली. काही काळानंतर पक्ष सावरला; पण गटबाजी, बेशिस्त हा त्याचा अविभाज्य भाग झाला. मराठा विरुद्ध मराठेतर असाही वाद सुरू झाला. त्याच परिस्थितीत त्यांनी १९२३ व १९२६ च्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका लढविल्या. पुढे १९२७ ला सायमन आयोगाच्या नेमणुकीची घोषणा झाल्यावर, सायमन आयोगाला सहकार्य करावे की नाही, याबाबत ब्राह्मणेतर पक्षात रण माजले.

१९२९ सालच्या लाहोरच्या अधिवेशनात काँग्रेसने संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करणारा ठराव मंजूर केला आणि सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू केली. ब्राह्मणेतर पक्षात याविषयी मतमतांतरे झाली. ब्राह्मणेतर पक्षामधील तरुणांनी महात्मा गांधींच्या चळवळीला पाठिंबा देण्याचा निर्णय घेतला, तर दुसऱ्या गटाने वसाहतीच्या

स्वराज्याचा पुनरुच्चार केला. महात्मा गांधींच्या नेतृत्वामुळे काँग्रेस सर्वसामान्याचा पक्ष झाला. शेतकऱ्यांच्या हिताचे ठराव काँग्रेसकडून केले जाऊ लागले. या पार्श्वभूमीवर ब्राह्मणेतर चळवळीतील कार्यकर्ते हळूहळू काँग्रेसमध्ये सहभागी होऊ लागले आणि १९३९ मध्ये ब्राह्मणेतर पक्षाचे महत्त्व संपुष्टात आले.

इ) दलित मुक्ती आंदोलन

काँग्रेसच्या नेतृत्वाखाली चाललेल्या राष्ट्रीय चळवळीचे अंतिम ध्येय स्वराज्यप्राप्ती हे होते; परंतु अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींना या स्वराज्यात कोणतीही भागीदारी मिळणार नाही, याची जाणीव या समाजास हळूहळू होऊ लागली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी १९२२ नंतर याची जाणीव करून देण्याचा प्रयत्न सुरू केला आणि १९२७ नंतर त्यास संघर्षशील चळवळीचे स्वरूप प्राप्त झाले. मूलतः अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातींचे प्रश्न सोडविण्यासाठी जोतीबा फुले, गोपाळबाबा वळसंगकर, शिवराम जानबा कांबळे, शाहू छत्रपती, सयाजीराव गायकवाड, विठ्ठल रामजी शिंदे यांनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत प्रयत्न केले होते. विठ्ठल रामजी शिंदे यांनी निराश्रित साहाय्यकारी मंडळ स्थापन करून अस्पृश्यांना संघटित करण्याचा प्रयत्न १९०६ साली केला होता. अस्पृश्यांवरील अन्यायाकडे इतरांचे लक्ष वेधण्यासाठी शिंदे यांनी १९०७ पासून अस्पृश्यताविरोधी परिषद विविध प्रांतांमध्ये घेण्यास प्रारंभ केला. या परिषदांमध्ये काँग्रेसचे कार्यकर्तेही हजर राहत असत. बिपीनचंद्र पालांसारख्या महत्त्वाच्या नेत्यांचा त्यांत समावेश होता. महात्मा गांधीही या परिषदांना शुभेच्छासंदेश पाठवत असत. छ. शाहू महाराजांनीही अस्पृश्यांना मोफत शिक्षण मिळावे यासाठी शाळा व वसतिगृहे सुरू केली. आपल्या प्रशासनात अस्पृश्यांना जागा मिळाव्यात, यासाठी त्यांनी खास प्रयत्न केला. त्यांना समान वागणूक दिली जाईल, याची दक्षता घेतली. बडोद्याचे राजे सयाजीराव गायकवाड यांनी अस्पृश्योद्धाराचे मोठ्या काम मोठ्या प्रमाणात केले. डॉ. आंबेडकरांना शिक्षणासाठी मदत करण्यात सयाजीराव गायकवाडांचा मोठा वाटा होता.

१९२२ नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांकडे दलित मुक्तीच्या लढ्याचे नेतृत्व आले. त्यांनी तीन दिशांनी काम करण्यास सुरुवात केली. पहिले, अस्पृश्यांना जागृत करणे आणि त्यांचे संघटन करणे; दुसरे, अस्पृश्यांना राजकीय प्रतिनिधित्व मिळवून देणे आणि तिसरे, त्यांना शिक्षण घेण्यास प्रोत्साहित करणे. अस्पृश्यांत शिक्षणप्रसार व्हावा, त्यांच्यात राजकीय जागृती निर्माण व्हावी, म्हणून १९२४ मध्ये त्यांनी बहिष्कृत हितकारणी सभा स्थापन केली, 'बहिष्कृत भारत' हे वृत्तपत्र सुरू केले आणि त्याद्वारे अस्पृश्यतेविरोधात जागृती करण्याचा प्रयत्न केला. महाड सत्याग्रह करून त्यांनी चवदार तळ्याचे पाणी अस्पृश्यांना खुले करून दिले. काळाराम मंदिराची दारे त्यांच्यासाठी उघडी करून दिली.

आंबेडकरांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला नाही. त्यांनी आपले सगळे लक्ष अस्पृश्योद्धारावर केंद्रित केले. कारण काँग्रेस केवळ उच्चवर्णीयांच्या हितसंबंधांचे रक्षण करते, अशी त्यांची धारणा होती. जोपर्यंत अस्पृश्यांना राजकीय सत्तेत वाटा मिळत नाही, तोपर्यंत त्यांचा उद्धार होणार नाही, अशी त्यांची धारणा होती, म्हणूनच साऊथबुरो समितीसमोर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी साक्ष देताना अस्पृश्यांसाठी विभक्त मतदारसंघ असावेत, अशी मागणी केली. अस्पृश्यवर्गाचे प्रतिनिधी म्हणून अस्पृश्यवर्गात जन्म न झालेल्या कोणत्याही व्यक्तीस निवडून देऊ नये अथवा नेमू नये, यावर त्यांनी साक्षीत भर दिला.

आंबेडकरांनी सायमन आयोगापुढेही याच मागणीचा पुनरुच्चार केला. पुढे ब्रिटिश सरकारने जेव्हा आंबेडकरांना अस्पृश्यांचा प्रतिनिधी म्हणून गोलमेज परिषदांमध्ये निमंत्रित केले, तेव्हाही त्यांनी आपली हीच मागणी पुढे ठेवली. पहिल्या दोन गोलमेज परिषदांमध्ये आपली भूमिका ब्रिटिश सरकारला पटवून देण्यात त्यांना यश आले. सायमन कमिशनच्या शिफारशीनुसार रॅम्से मॅकडोनाल्ड यांनी जातीय निवाड्याच्याआधारे अस्पृश्यांच्या विभक्त मतदार-संघाच्या मागणीस मान्यता दिली. परंतु विभक्त मतदार संघामुळे हिंदू समाजात फूट पडेल, अशी महात्मा गांधींची भूमिका होती. म्हणून त्यांनी यास विरोध केला व बाबा-साहेबांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यात त्यांना आपयश आल्यानंतर त्यांनी उपोषण सुरू केले. गांधी जीवन-मरणाच्या दारात उभे राहिलेले पाहून डॉ. आंबेडकरांनी विभक्त मतदार संघाऐवजी राखीव

जागेस मान्यता दिली. गांधी आणि आंबेडकर यांच्यात या वेळी जो करार झाला, तोच 'पुणे करार' म्हणून ओळखला जातो.

### सायमन कमिशन आणि लाहोरचे अधिवेशन

१९२७ पर्यंत राष्ट्रीय चळवळ काही प्रमाणात थंडावली होती. परंतु त्यानंतर मात्र तिचा आलेख पुन्हा एकदा उंचावू लागला. १९१९ च्या सुधारणा कायद्यासंबंधी भारतीयांनी असंतोष व्यक्त केला होता. या पार्श्वभूमीवर भारतात घटनात्मक प्रगती कशी करता येईल, यासंबंधी शिफारस 'करण्यासाठी ब्रिटिश सरकारने सायमन आयोगाची स्थापना करण्याचा निर्णय १९२७ साली घेतला. त्यामध्ये एकाही भारतीयाला सदस्य म्हणून घेतले नव्हते. त्यातील सर्व सदस्य युरोपियन होते. भारतीयांना ही बाब रुचली नाही. भारताच्या भविष्याचा आराखडा तयार करण्याच्या कामात एकाही भारतीयाला समाविष्ट न करणे हा त्यांना अपमान वाटू लागला. म्हणूनच सायमन आयोगाला विरोध करण्यासाठी भारतीयांनी बहिष्काराचा मार्ग स्वीकारला. सर्व राजकीय पक्षांनी त्यात सहभाग घेतला. सर्व भारतभर हरताळ पाळण्यात आला. 'सायमन परत जा' या घोषणा सर्वत्र निनादू लागल्या. पोलिसांनी हे आंदोलन दडपून टाकण्याचा प्रयत्न केला. जमावावर लाठीमार करणे नित्याचीच बाब झाली. अशाच एका घटनेत लाला लजपतराय यांना मार बसला आणि त्यांचे निधन झाले. या आंदोलनात तरुणांनी व युवकांनी सक्रिय सहभाग घेतला. यातूनच युवकांच्या अनेक संघटना उदयाला आल्या. जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस यांचे नेतृत्व याच काळात उदयाला आले.

तत्कालीन ब्रिटिश सरकार त्या वेळी कंझरवेटीव्ह पक्षाच्या हातात होते. या पक्षाचे भारतमंत्री बरकनहेड यांनी भारतासाठीचा घटनात्मक आराखडा तयार करण्यास भारतीय सक्षम नाहीत, अशी टीका केली होती. या टीकेला समर्पक उत्तर म्हणून, सायमन आयोगाला पर्याय म्हणून फेब्रुवारी १९२८ मध्ये सर्वपक्षीय परिषद बोलविण्यात आली. तिने भारताचा घटनात्मक आराखडा तयार केला. मोतीलाल नेहरू या परिषदेचे अध्यक्ष होते. यामुळे परिषदेने तयार केलेला अहवाल नेहरू रिपोर्ट म्हणून प्रसिद्ध झाला. त्यामध्ये प्रौढ मताधिकार, संघटना-स्वातंत्र्य, स्त्रियांना समान हक्क इत्यादी तरतुदी होत्या. परंतु बॅरिस्टर जिना (मुस्लिम लीगचे नेते) मुस्लिमबहुल प्रदेशात मुसलमानांना राखीव जागा द्यावात, या मुद्द्यावर अडून बसले आणि त्यांनी नेहरू रिपोर्टचा पाठिंबा काढून घेतला. काँग्रेसमधील जहाल तरुण नेतृत्वाचा नेहरू रिपोर्टला आक्षेप होता. 'वासाहतिक स्वराज्याच्या कल्पने-वर त्यांना पूर्ण स्वराज्य' हवे होते. त्यांच्या भूमिकेला काँग्रेसमध्ये हळूहळू पाठबळ मिळू लागले.

१९२९ च्या लाहोर अधिवेशनात काँग्रेसने पूर्ण स्वराज्याचा ठराव संमत केला. त्या वेळी पंडित जवाहर-लाल नेहरू काँग्रेसचे अध्यक्ष होते व त्यांनीच पूर्ण स्वराज्य ही कल्पना लोकप्रिय केली होती. पूर्ण स्वराज्याच्या उद्दिष्टांची पूर्तता करण्यासाठी सविनय कायदेभंगाचा मार्ग निवडण्यात आला.

### सविनय कायदेभंग (१९३०-३२)

सविनय कायदेभंगाचे पहिले पाऊल म्हणून महात्मा गांधींनी मिठावरील कराचा निषेध करण्यासाठी मिठाचा सत्याग्रह करण्याचे ठरविले. १२ मार्च १९३० रोजी गांधीजींनी आपल्या आश्रमातील ७९ सत्याग्रहींसह दांडी-यात्रेस प्रारंभ केला. २४० मैलांचा पल्ला पूर्ण करून ते सर्व सत्याग्रही दांडीच्या किनारपट्टीवर पोचले. तेथील मीठ हातात घेऊन गांधींनी व इतर सत्याग्रहींनी मिठावरील कराचा कायदा मोडला. दांडीयात्रा सुरू होण्यापूर्वी आणि यात्रेदरम्यान महात्मा गांधींनी सविनय कायदेभंगाबद्दल भारतीयांना मार्गदर्शन केले. यात्रेत त्यांचे ठिकठिकाणी स्वागत करण्यात आले. दांडीयात्रेबद्दल भारतीयांच्या मनात उत्सुकता व उत्साह होता. गांधींनी मीठ हातात घेऊन सविनय कायदेभंगाला सुरुवात केल्यानंतर भारतभर या चळवळीला जोर आला. ठिकठिकाणी मिठाचे सत्याग्रह करण्यात आले. परदेशी कपड्यांवर व दारूवर बहिष्कार टाकणे, कर न भरणे याबरोबरच राष्ट्रीय झेंडा फडकविणे, खादी कपड्यांचा, गांधीटोपीचा वापर करणे असे अनेक मार्ग वापरण्यात आले. काँग्रेस कार्यकर्ते गावागावांत जाऊन लोकांमध्ये राष्ट्रीय भावना जागृत करण्याचे काम करू लागले. ब्रिटिश सरकारने सुरुवातीला या चळवळी-कडे काहीसे दुर्लक्ष केले. त्याचाही फायदा काँग्रेस कार्यकर्त्यांनी लोकांमध्ये राष्ट्रीय प्रेरणा जागृत करण्यासाठी

घेतला. ब्रिटिश सरकार आता आपल्याला घाबरू लागले आहे, असे सांगून त्यांनी लोकांमध्ये आत्मविश्वास निर्माण केला. परंतु गांधींना अटक करण्यासाठी ब्रिटिश सरकार-कडून दबाव वाढू लागला आणि ४ मे रोजी गांधींच्या अटकेचे फर्मान निघाले. गांधींना अटक झाल्यानंतर देशभर मोठ्या प्रमाणात निदर्शने झाली. परंतु सत्याग्रहाचा जोर मात्र कमी झाला नाही. गुजरातेत सरोजिनी नायडू, इमामसाहेब, गांधींचे पुत्र मणिलाल यांनी अधिक जोरदारपणे अहिंसक सत्याग्रह केला. त्याचे लोण देशभर पसरले.

सविनय कायदेभंगाच्या या सत्याग्रहात स्त्रिया मोठ्या प्रमाणात सहभागी झाल्या. महात्मा गांधींनी स्त्रियांना आंदोलनाचे नेतृत्व करण्याचे आवाहन केले होते. त्याप्रमाणे परदेशी कपड्यांच्या दुकानांसमोर, दारूदुकानांसमोर पिके-टिंग करणे, प्रत्यक्ष सत्याग्रहात सहभागी होणे यांद्वारे स्त्रिया पहिल्यांदाच एवढ्या मोठ्या संख्येने घराबाहेर पडून सविनय कायदेभंगाच्या चळवळीत सहभागी झाल्या. विद्यार्थी व युवकांनीही यात हिरिरीने भाग घेतला. या चळवळीने साम्राज्यवादविरोधी लढ्याचे पुढचे पाऊल टाकले होते. जवळपास ९०,००० लोक या चळवळी-दरम्यान तुरुंगात गेले होते. ब्रिटिश सत्तेला हे एक मोठे आव्हानच होते. १९३० च्या लढ्यात सोलापूर व पेशावर येथे मोठे संघर्ष झाले.

**गोलमेज परिषद**

भारतामध्ये घटनात्मक शासन प्रस्थापित करण्यासाठी घटनेचा आराखडा तयार करण्याची गरज होती. सविनय कायदेभंगाच्या चळवळीच्या पार्श्वभूमीवर त्यासंबंधी तातडीने निर्णय घेण्याची गरज ब्रिटिश सरकारला जाणवू लागली. त्याप्रमाणे भारतीय आणि ब्रिटिश यांच्यात समोरासमोर चर्चा घडवून आणण्यासाठी लंडन येथे गोलमेज परिषद घेण्याचे ठरले. भारताच्या घटनात्मक शासनाच्या निर्मितीमध्ये ब्रिटिशांच्या बरोबरीने भारतीयांना स्थान मिळण्याची ही पहिलीच वेळ होती. पहिली गोलमेज परिषद १२ जानेवारी १९३१ रोजी भरली. त्यास काँग्रेस वगळता इतर पक्षांचे प्रतिनिधी हजर होते. परंतु काँग्रेसच्या सहभागाशिवाय कोणतीही चर्चा मूर्तरूप घेऊ शकत नाही, असाच सूर अनेकांनी व्यक्त केला. ब्रिटिश सरकारनेही काँग्रेसच्या सहभागाची अपरिहार्यता वर्तविली. त्यानुसार महात्मा गांधी आणि इतर काँग्रेसच्या नेत्यांची तुरुंगातून मुक्तता करण्यात आली. पुढील दिशा ठरविण्यासाठी काँग्रेसच्या कार्यकर्त्यांची आपापसात आणि पहिल्या गोलमेज परिषदेला उपस्थित विविध पक्षांच्या नेत्याची चर्चा झाली. त्यानंतर काँग्रेसने महात्मा गांधींना व्हाईसरॉयशी चर्चा करण्याचे अधिकार दिले. गांधी आणि व्हाईसरॉय आयर्विन यांच्यात प्रदीर्घ चर्चा होऊन ५ मार्च १९३१ रोजी गांधी-आयर्विन करार करण्यात आला.

गांधी-आयर्विन करारानुसार सर्व राजकीय बंद्यांची सुटका करावी, सविनय कायदेभंगाच्या चळवळीदरम्यान जो शेतसारा भरला नव्हता तो माफ करावा, जप्त केलेल्या जमिनी शेतकऱ्यांना परत दिल्या जाव्यात, ज्या सरकारी नोकरांनी आंदोलनकाळात राजीनामे दिले होते त्यांना पुन्हा एकदा नोकऱ्यांमध्ये सामावून घ्यावे इत्यादी गोष्टी मान्य करण्यात आल्या. त्या बदल्यात काँग्रेसने सविनय कायदेभंगाची चळवळ स्थगित करावी, असे ठरले. तसेच दुसऱ्या गोलमेज परिषदेत काँग्रेसने सहभागी होण्याचे मान्य केले. मार्च १९३१ ला कराची येथे झालेल्या अधिवेशनात गांधी-आयर्विन करारावर शिक्कामोर्तब करण्यात आले. त्यानंतर दुसऱ्या गोलमेज परिषदेला हजर राहण्यासाठी महात्मा गांधी २९ ऑगस्ट १९३१ रोजी लंडनला रवाना झाले या परिषदेत ब्रिटिश सरकार गांधींची स्वातंत्र्याची मागणी मान्य करण्यास तयार झाले नाही; उलट, सरकारने छोट्या गटांच्या मागण्यांना पाठिंबा देऊन गांधींची कोंडी करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे गांधी मोकळ्या हाताने परतले. २८ डिसेंबरला ते मुंबईत उतरले. दुसऱ्या दिवशी काँग्रेस कार्यकारी समितीने सविनय कायदेभंगाची चळवळ पुन्हा सुरू करण्याचा निर्णय घेतला. सविनय कायदेभंगाच्या या दुसऱ्या फेरीत पुन्हा एकदा लोक मोठ्या संख्येने सहभागी झाले. परंतु या वेळी सरकारने हे आंदोलन दडपण्याचा प्रयत्न केला. पहिल्या चार महिन्यांतच ८०,००० सत्याग्रही तुरुंगामध्ये गेले आणि काही महिन्यांतच हे आंदोलन मोडून काढण्यात सरकारला यश आले. १९३४ मध्ये आंदोलनाची धुकधुक थंडावली.

१९३२ मध्ये आंबेडकर आणि महात्मा गांधी यांच्यात पुणे करार झाला. या करारानंतर गांधींनी अस्पृश्यतेविरोधात

काम करण्यास अग्रक्रम दिला. १९३३ व १९३४ या दोन वर्षात त्यांनी 'हरिजन सेवक संघा'च्या माध्यमातून सवर्ण हिंदूंच्या मानसिकतेत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला. गांधी आपल्या रचनात्मक कार्यक्रमाद्वारे हरिजन उद्धाराचे काम करत असताना काँग्रेसमध्ये डाव्या विचारांचा प्रभाव वाढू लागला आणि त्यातूनच काँग्रेस समाजवादी पक्षाचा जन्म झाला.

**काँग्रेस समाजवादी पक्ष**

१९२० व १९३० च्या दशकांत भारतात डाव्या विचारसरणीच्या गटांचा उदय झाला. त्यांनी राष्ट्रीय काँग्रेसला अधिक जहाल स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. काँग्रेसमध्ये जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस यांच्या-सारखे तरुण नेते समाजवादाने प्रेरित झाले. काँग्रेसच्या बाहेरही शेकडो युवक समाजवादी गटांमध्ये सहभागी होऊ लागले. चंद्रशेखर आझाद, भगतसिंग यांच्यासारखे क्रांतिकारी तरुणही त्याकडे आकृष्ट झाले होते. १९३० च्या दशकात जगभर आर्थिक मंदी आल्यानंतर समाजवादी विचारांकडे युवकांचा ओढा अधिकच वाढला.

१९३०-३१ आणि १९३२-३४ या काळातील सविनय कायदेभंगाच्या काळात जे तरुण काँग्रेस कार्यकर्ते तुरुंगात गेले होते, त्यांनी गांधीमार्गाला पर्याय म्हणून समाजवादाचा मार्ग निवडला आणि काँग्रेसअंतर्गत समाजवादी पक्षाची स्थापना करण्याचा निर्णय घेतला. अंतिमतः ऑक्टोबर १९३४ मध्ये जयप्रकाश नारायण, आचार्य नरेंद्र देव, मिनू मसानी यांच्या नेतृत्वाखाली काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना करण्यात आली. या पक्षाने भारतीय स्वातंत्र्याला समाजवादी आशय दिला जावा, यासाठी प्रयत्न केले. या पक्षाच्या स्थापनेनंतर काही दिवसांतच १९३५ चा भारत सरकार कायदा तयार करण्यात आला. १९३५ च्या कायद्यातील काही तरतुदी कालांतराने भारतीय राज्यघटनेत प्रतिबिंबित झाल्या.

इ. स. १९१०-३५ या काळात काँग्रेस पक्षाचे राजकारण डावीकडे झुकले व अनेक चळवळी सुरू झाल्या. त्यात शेतकरी व कामगार यांच्या चळवळी, कम्युनिस्ट चळवळ, दलित चळवळ या चळवळी महत्त्वाच्या होत्या. १९३० ची सविनय कायदेभंगाची चळवळ खूप व्यापक होती. त्याचप्रमाणे किसान सभांच्या चळवळींनी लाखो शेतकऱ्यांनी लढा देण्याची तयारी केली. ते लढाईत सामील झाले. कामगार, विद्यार्थी व तरुणांच्या नव्या संघटना उभ्या राहिल्या. हिंदुत्ववादी संघटना पण याच काळात निर्माण झाल्या. त्यामुळे काँग्रेसच्या इतिहासातील हा कालखंड महत्त्वाचा ठरला. मध्यमवर्गीयांचा पाठिंबा असणारा हा पक्ष जनतेचा पक्ष बनला आणि तो उद्याचा सत्ताधारी पक्ष बनणार, ही गोष्ट स्पष्ट झाली. काँग्रेस पक्षान्तर्गत निर्माण झालेला जयप्रकाश नारायण यांचा काँग्रेस समाजवादी पक्ष आणि भारतीय कम्युनिस्ट पक्ष हे दोन नवे डावे पक्ष राजकारणात आले. मीरत खटल्यातून सुटून आलेल्या कम्युनिस्ट नेत्यांनी काँग्रेस पक्षान्तर्गत काम करावयास सुरुवात केली. वर्गीय पायावर शेतकरी व कामगार संघटित झाले. त्यांचे मोठे लढे उभे राहिले. जातीय निवाड्यातून जातीयवादी राजकारण पुढे नेले गेले; पण डॉ. आंबेडकर व गांधी यांच्यातील पुणे करारामुळे त्याचे दुष्परिणाम कमी झाले. मुस्लिम लीगशी मात्र या काळात काँग्रेसचा करार झाला नाही. थोडक्यात, १९१०-३५ हा भारतीय काँग्रेससाठी महत्त्वाचा काळ ठरला.

☆☆☆

# कॉँग्रेस पक्ष आणि घटनात्मक विकास (१९३६-१९६०)

प्रा. डॉ. शिवाजी पाटील

भारतीय राज्यघटनेवर कॉँग्रेस पक्षामधील नेत्यांचा व त्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रचंड प्रभाव पडलेला आहे. अर्थात भारताच्या राष्ट्रीय चळवळीमध्ये भारतीय राष्ट्रीय कॉँग्रेस पक्षही अग्रभागी होता. ब्रिटिश सरकारकडे भारतीय जनतेच्या वतीने कॉँग्रेसने अनेक मागण्या, प्रस्ताव, विनंत्या केल्या व त्याला प्रतिसाद म्हणून ब्रिटिश आपल्या राज्य-कारभारात वर्चस्व ठेवत स्वतःच्या सोयीनुसार काही मागण्या मान्य करीत होते. या प्रक्रियेमधून भारतामध्ये हळूहळू घटनात्मक विकास होत होता. कॉँग्रेसमधील मवाळ गटांना खूष करण्यासाठी ब्रिटिश सरकार घटनात्मक सुधारणा व सवलती देत होते. भारतामधील जहालवाद्यांचा, कम्युनिस्टांचा, क्रांतिकारी गटांचा प्रभाव कमी करून ते गट निष्क्रिय करणे हा स्वार्थी हेतू या सुधारणा देताना होता, असे लक्षात येते.

भारतीयांसाठी एक स्वतंत्र राज्यघटना असावी व ती खुद्द भारतीयांनी केलेली असावी, असा एक विचार सातत्याने मांडला जात होता. किंबहुना हा विचार स्वातंत्र्य आंदोलनाचा भाग होता. लोकमान्य टिळक, म. गांधी, मोतीलाल नेहरू पुढे पं. नेहरू यांनी स्पष्ट शब्दांत राज्यघटनानिर्मितीसाठी घटना समितीची मागणी केली.

सदरच्या लेखाच्या कालखंडावर मुख्यतः नेहरू रिपोर्ट, गोलमेज परिषद, सविनय कायदेभंग चळवळ इ. पाठीमागील घडामोडींचा प्रभाव आहे. घटनात्मक विकासाच्या दृष्टीने नेहरू रिपोर्टचे महत्त्व आहे.

**नेहरू रिपोर्ट**

सायमन कमिशनने सादर केलेल्या रिपोर्टला भारता-तील सर्व राजकीय संघटनांनी विरोध केला. यावर चिडून तत्कालीन भारतमंत्री बर्कनहेड यांनी 'सर्वमान्य अशी राज्यघटना देण्यास भारतीय असमर्थ आहेत', अशी टीका केली. या टीकेला उत्तर देण्यासाठी कॉँग्रेसच्या पुढाकाराने ११ मे १९२८ रोजी एक सर्वपक्षीय परिषद मुंबई येथे घेण्यात आली. यानुसार मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली एक सर्वपक्षीय समिती करण्यात आली. या समितीत बॅरिस्टर जयकर, अली इमाम, सुभाषचंद्र बोस, तेजबहादूर सप्रु इ. चा समावेश होता. पंडित जवाहरलाल नेहरू हे या समितीचे सदस्य होते.

समितीने भिन्न राजकीय पक्षांच्या सदस्यांच्या वेग-वेगळ्या पैलूंचा व्यापक विचार करून अहवाल तयार केला. यालाच 'नेहरू अहवाल' असे म्हटले जाते. २२ डिसेंबर १९२८ रोजी डॉ. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखाली कलकत्ता येथील सर्वपक्षीय परिषदेपुढे हा अहवाल मांडण्यात आला. यामधील प्रमुख तरतुदी पुढीलप्रमाणे होत्या :- देशी संस्थानांना भारतात विलीन करून संघ-राज्याची निर्मिती करण्यात यावी. भारताला वसाहतीचे स्वराज्य म्हणून स्वतंत्र दर्जा मिळावा. त्यानंतर पूर्ण स्वातंत्र्य हेच पुढचे ध्येय राहील. भारतीय नागरिकांना मूलभूत अधिकार द्यावेत. केंद्रीय कायदेमंडळ द्विगृही व प्रांतीय कायदेमंडळ एकगृही असावे. वसाहतीच्या पार्लमेंटप्रमाणे केंद्रीय कायदेमंडळाला अधिकार असावेत. अल्पसंख्याकांना लोकसंख्येच्या प्रमाणात कायदेमंडळात राखीव जागा ठेवून संयुक्त मतदार संघातून निवडणुका घेण्यात याव्यात. प्रांतांची पुनर्रचना समान भाषिक तत्त्वाच्या आधारे केली जावी. एकवीस वर्षांवरील सर्व स्त्री-पुरुषांना मताधिकार देण्यात यावा.

हा अहवाल म्हणजे भावी राज्यघटनेचा आराखडा होता. भारतामधील भिन्न पक्षांनी एकत्र बसून तयार केलेला हा पहिला व अखेरचा घटनात्मक मसुदा होता. परंतु बॅ. जिनांनी या अहवालाला मुस्लिम प्रतिनिधित्वाच्या मुद्द्यावरून विरोध केला व आपल्या चौदा मागण्या मान्य करण्याची अट घातली. कॉँग्रेसने नेहरू अहवाल स्वीकारला, तर मुस्लिम लीग व हिंदू महासभा यांनी हा अहवाल नाकारला. पुढे भारतीय राज्यघटनेत या अहवाला-तील अनेक तरतुदी विस्ताराने घेतलेल्या आहेत.

नेहरू अहवालाच्या तरतुदी एक वर्षाच्या आत

स्वीकाराव्यात, अशी घोषणा काँग्रेसने केली होती. परंतु ब्रिटिश सरकारने याबाबत कोणतेच पाऊल उचलले नाही. या पार्श्वभूमीवर १९२९ मध्ये पं. नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली लाहोर येथे भरलेल्या अधिवेशनात 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा ठराव संमत झाला. २६ जानेवारी १९३० हा दिवस 'स्वातंत्र्य दिन' म्हणून भारतीयांनी साजरासुद्धा केला. हाच दिवस स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेच्या अंमल-बजावणीसाठी निश्चित केला व २६ जानेवारी १९५०ला भारतीय राज्यघटना अमलात आली.

दरम्यान गांधीजींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने सविनय कायदेभंगाची चळवळ १९३० मध्ये सुरू केली. गव्हर्नर जनरल लॉर्ड आयर्विन यांनी काँग्रेसने इंग्लंडमध्ये होणाऱ्या गोलमेज परिषदेमध्ये सहभाग घेण्याविषयी आवाहन केले. परंतु काँग्रेसने पहिल्या (१९३०) व तिसऱ्या (१९३२) गोलमेज परिषदेवर बहिष्कार टाकला व फक्त १९३१ च्या दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये सहभाग घेतला. म. गांधींनी काँग्रेसचे प्रतिनिधित्व केले.

### १९३५ चा कायदा

सायमन कमिशन अहवाल, गोलमेज परिषदेमधील चर्चा, १९२० ते १९३५ मधील काँग्रेस व मुस्लिम लीगने केलेल्या मागण्या लक्षात घेऊन ब्रिटिशांनी १९३५ चा भारत प्रशासन कायदा संमत केला. हा कायदा अत्यंत गुंतागुंतीचा व मोठा होता. या कायद्यामध्ये पुढील प्रमुख तरतुदी होत्या :- यानुसार केंद्रात संघराज्य निर्माण करावे. या संघराज्यात ब्रिटिश प्रांत व भारतातील संस्थाने असावीत, मात्र संघराज्यात सामील होण्याची सक्ती संस्थानांवर नसावी. प्रांतातील द्विदल राज्यपद्धती रद्द करून त्याऐवजी प्रांतिक स्वायत्तता दिली व केंद्रामध्ये द्विदल शासनपद्धती सुरू करण्याची तरतूद केली.

१९३५ च्या कायद्यानुसार प्रांतामध्ये निवडणुका होणार होत्या. प्रांतामधील निवडणुका लढविण्याचे काँग्रेसने १९३६ च्या लखनौ येथील विशेष अधिवेशनात ठरविले. १९३७ मधील निवडणुकीत आठ प्रांतांत काँग्रेसला तर तीन प्रांतांमध्ये मुस्लिम लीगला मताधिक्य मिळाले. काँग्रेस मंत्रिमंडळांनी अनेक आर्थिक व लोककल्याणकारी कायदे केले व तशा स्वरूपाचे कार्यक्रमही राबविले. ब्रिटिशांपेक्षा चांगले शासन आपण करू शकतो, हे जनतेला दाखवून दिले. त्यामुळे काँग्रेसविषयी लोकांचा आदर व लोकप्रियता वाढली.

दरम्यान १९३९ मध्ये दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली. या युद्धामध्ये भारतीयांनी ब्रिटिशांना सहकार्य करावे, ही ब्रिटिशांची इच्छा होती. काही भारतीय नेत्यांनी सहकार्य करण्यास विरोध दर्शविला होता. या पार्श्वभूमीवर भारताचा आपल्याला महायुद्धासाठी पाठिंबा मिळविण्यासाठी ब्रिटिश पंतप्रधानांनी स्टॅफर्ड क्रिप्स यांना मार्च १९४२ मध्ये वाटाघाटीसाठी पाठविले. परंतु क्रिप्स यांनी जाहीर केलेल्या योजनेमुळे देशाचे तुकडे होण्याची शक्यता असल्याने काँग्रेसने ही योजना नाकारली; तर पाकिस्तानचा स्पष्ट उल्लेख नसल्याने मुस्लिम लीगने या योजनेला नकार दिला. पुढे वर्धा येथील दि. १४ जुलै १९४२ च्या वर्किंग कमिटीमध्ये ब्रिटिशांनी भारत सोडून जावा; असा ठराव झाला. गांधीनी 'करा किंवा मरा' संदेश दिला व 'चले जाव' चळवळ सुरू झाली. या चळवळीमुळे मोठ्या प्रमाणात जनतेचा सहभाग वाढला. अमेरिका, चीन इ. देशांना भारतामधील असंतोषाची कल्पना आली.

'चले जाव' चळवळीमधून प्रकट झालेला असंतोष कमी करण्यासाठी, भारतामधील राजकीय प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या दृष्टीने १४ जून १९४५ रोजी सरकारने वेव्हेल योजना जाहीर केली. यामध्ये राज्यघटना निर्माण करण्याची जबाबदारी भारतीयांवर राहील व अस्पृश्यांना प्रतिनिधित्व अशा मुख्य तरतुदी होत्या. परंतु बॅ. जिनांनी ही योजना अमान्य केली. जिनांच्या मते मुस्लिमांचे नेतृत्व फक्त लीगने करावे, काँग्रेसने करू नये. या मुद्द्यावरून मतभेद झाले. याबाबतची सिमला परिषदही अयशस्वी ठरली.

### कॅबिनेट मिशन योजना व राज्यघटना निर्मितिप्रक्रिया

जुलै १९४५ मध्ये इंग्लंडमध्ये मजूर पक्षाचे सरकार आले. पंतप्रधान लॉर्ड ॲटली यांनी भारताला 'स्वातंत्र्य' देण्याचे धोरण पहिल्यांदाच जाहीर केले. याला अनुसरून कॅबिनेट किंवा त्रिमंत्री योजनेची घोषणा केली. भारतमंत्री पॅथिक लॉरेन्स, स्ट्रॅफर्ड क्रिप्स व ए. व्ही. अलेक्झांडर या तीन मंत्र्यांचा समावेश असलेले शिष्टमंडळ भारतात पाठविण्यात आले. १६ मे १९४६ रोजी या समितीने आपली योजना जाहीर केली. यालाच 'कॅबिनेट मिशन'

किंवा 'त्रिमंत्री योजना' असे म्हटले जाते.

या योजनेमधील महत्त्वाची तरतूद म्हणजे भारतासाठी राज्यघटना निर्माण करण्यासाठी निवडणुकीच्या आधारावर एका 'घटना परिषदे'ची निर्मिती करण्यात यावी. काँग्रेसने या योजनेस मान्यता दिली, तर मुस्लिम लीगने ही योजना फेटाळली. पुढे माऊंटबॅटन योजनेवरून एक विधेयक तयार करून १८ जुलै १९४७ रोजी ब्रिटिश संसदेने 'भारतीय स्वातंत्र्याचा कायदा' संमत केला व भारताची फाळणी होऊन १५ ऑगस्ट १९४७ पासून भारत व पाकिस्तान हे स्वतंत्र देश म्हणून अस्तित्वात आले.

**घटना समितीची निर्मिती व काँग्रेसचे बहुमत**

कॅबिनेट मिशन योजनेमधील तरतुदीप्रमाणे जुलै १९४६ मध्ये घटना समितीच्या निर्मितीसाठी निवडणुका झाल्या. घटनापरिषदेसाठी असलेल्या ३८९ सदस्यांपैकी ब्रिटिश प्रांतातील २९६ जागांसाठी निवडणुका झाल्या. या निवडणुकीत काँग्रेसचे २०८, मुस्लिम लीगचे ७३ व इतर पक्ष आणि स्वतंत्र १५ प्रतिनिधी निवडून आले. मुस्लिम लीगला कमी जागा मिळाल्यामुळे लीगने घटना समितीच्या कामकाजात भाग न घेण्याचा निर्णय घेतला व घटना समितीच्या ९ डिसेंबर १९४६ रोजी भरलेल्या पहिल्या बैठकीपासून लीगचे सदस्य अनुपस्थित राहिले. लीगने पाकिस्तानसाठी स्वतंत्र घटनापरिषदेची मागणी करण्यास सुरुवात केली.

घटना समितीच्या रचनेचा विचार करता त्यामध्ये काँग्रेस पक्षाचे प्रचंड बहुमत होते. फाळणीपूर्वी काँग्रेसचे घटना समितीमध्ये ६९% इतके बहुमत होते, तर फाळणी-नंतर लीगचे केवळ २८ प्रतिनिधी राहिल्यामुळे काँग्रेसचे समितीमधील बहुमत ८२% इतके झाले. घटना समितीच्या पहिल्या बैठकीचे अध्यक्षस्थान डॉ. सच्चिदानंद सिन्हा यांनी भूषविले, तर ११ डिसेंबर १९४६ रोजी डॉ. राजेंद्र-प्रसाद यांची घटना समितीचे कायमचे अध्यक्ष म्हणून निवड करण्यात आली. घटना समितीच्या कामकाजासाठी विषयवार समित्या निर्माण केल्या होत्या. यामध्ये कामकाज समिती, प्रक्रिया समिती, वार्ता समिती, संचालन समिती, केंद्रीय घटना समिती, प्रांतीय घटना समिती, संघसरकार अधिकार समिती, मूलभूत हक्क आणि अल्पसंख्याक इत्यादींशी संबंधित समिती, मसुदा समिती इ. चा समावेश होता.

घटना समितीमध्ये काँग्रेसचे पं. जवाहरलाल नेहरू, सरदार वल्लभभाई पटेल, मौलाना अबुल कलाम आझाद, कन्हैयालाल मुन्शी इ. मातब्बर नेते होते.

प्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ व भारतीय राज्यघटनेचे अभ्यासक ग्रॅनव्हिले ऑस्टीन यांच्या मते, 'घटना समिती म्हणजे काँग्रेस होती व काँग्रेस म्हणजे भारत होता.' तत्कालीन केंद्रामधील व प्रांतांमधील सरकारेसुद्धा काँग्रेसच्या बहुमताची होती व यामधील बहुतांश प्रतिनिधी हे घटना समितीचे सदस्य होते. ऑस्टीन यांनी घटना समितीमधील सदस्य, काँग्रेसचे पक्षामधील पदाधिकारी व सरकारमध्ये स्थान असणाऱ्या सदस्यांची काही नावे दिली आहेत. हे सदस्य एकाच वेळी घटना समिती, काँग्रेस पक्ष व केंद्र सरकारमध्ये विविध पदांवर काम करीत होते.

खालील तक्ता वरील बाब स्पष्ट करतो.

| नाव | समितींची संख्या | काँग्रसमधील स्थान | सरकारमधील स्थान |
|---|---|---|---|
| प्रसाद | २ | वर्किंग समिति | घटना समिति अध्यक्ष |
| आझाद | ४ | वर्किंग समिति | मंत्री |
| पटेल | ४ | वर्किंग समिति | उपपंतप्रधान |
| नेहरू | ३ | वर्किंग समिति | पंतप्रधान |
| पंत | ३ | वर्किंग समिति | पंतप्रधान, यु. पी. |
| सीतारामय्या | ४ | वर्किंग समिति | – |
| अय्यर | ५ | – | – |
| अय्यंगार एन. जी. | ५ | – | मंत्री |
| मुन्शी | ६ | सदस्य | – |
| आंबेडकर | ३ | – | मंत्री |
| सिन्हा सत्यनारायण | २ | सदस्य | मंत्री व मुख्य प्रतोद |

संदर्भ : ग्रॅनव्हिले ऑस्टीन, 'द इंडियन कॉन्स्टिट्यूशन : कॉर्नरस्टोन ऑफ ए नेशन', ऑक्सफर्ड युनि. प्रेस, नवी

दिल्ली, २००१ पान नं. १९.

थोडक्यात, घटना समितीवर व पुढे राज्यघटनेवर काँग्रेसपक्ष व नेत्यांच्या विचारसरणीचा प्रभाव पडणे स्वाभाविक होते. काँग्रेस पक्षाच्या बैठकांमध्ये घटनेबाबत चर्चा होत असे, त्यावर निर्णय घेतले जात असत व त्यावर घटना समितीमध्ये शिक्कामोर्तब होत असे. काँग्रेसच्या प्रभावाने राज्यघटनेमध्ये अंतर्भूत झालेल्या महत्त्वाच्या तरतुदींची चर्चा येथे करणे आवश्यक आहे.

**उद्दिष्टांचा ठराव**

१३ डिसेंबर १९४६ रोजी पं. नेहरू यांनी घटना समितीमध्ये उद्दिष्टांचा ठराव मांडला व तो २३ जानेवारी १९४७ रोजी समितीने स्वीकृत केला. या ठरावामध्ये :– पुढील बाबींचा समावेश होता. भारत हा पूर्णतः स्वतंत्र व सार्वभौम असेल. भारतीय संघ व प्रांतांच्या सरकारच्या राजकीय शक्तीचा मूळ स्त्रोत जनता असेल. भारतीय नागरिकांना सामाजिक, आर्थिक, राजकीय न्याय, पद व संधी असेल. कायद्याची समता असेल. अल्पसंख्यांक, मागास जातिजमातींच्या हिताच्या रक्षणाची सर्व व्यवस्था असेल. भारताची अखंडता कायम ठेवण्याची व्यवस्था केली जाईल व भारत नेहमीच आंतरराष्ट्रीय शांततेसाठी, मानवाच्या कल्याणासाठी कार्य करेल.

**सरनामा किंवा उद्देश्यपत्रिका**

उद्दिष्टांचा ठराव पुढे राज्यघटनेचा सरनामा किंवा उद्देश्यपत्रिका म्हणून रूपांतरित झाला. हा सरनामा जगातील एक आदर्श सरनामा म्हणून मान्यता पावलेला आहे. पं. नेहरूंनी सरनामा तयार केला. यामधील प्रत्येक शब्द महत्त्वाचा, मोलाचा व तत्त्वज्ञान सांगणारा आहे. काँग्रेसने या तत्त्वज्ञानाला नेहमीच महत्त्व दिले आहे.

सरनाम्याचे थोडक्यात पुढीलप्रमाणे विश्लेषण करता येते :– यामधील 'आम्ही भारतीय जनता ..... ही घटना आज दि. २६ नोव्हेंबर १९४९ रोजी तयार, मान्य व स्वीकृत करीत आहोत' हा वाक्यांश राज्यघटनेची निर्माती ही भारतीय जनता आहे हे, दर्शविते.

**सरनाम्यामधील राजकीय तत्त्वज्ञान**

भारत हा 'सार्वभौम' आहे. म्हणजे भारतावर अंतर्गत व बाह्यदृष्ट्या कोणत्याही परकीय सत्तेचे नियंत्रण नाही. भारत पूर्णतः स्वतंत्र झालेला आहे. तसेच भारताने 'लोकशाहीचा' स्वीकार केला असून अंतिम सार्वभौम सत्ता जनतेच्या ठिकाणी आहे. भारतीय राज्याचे स्वरूप 'गणराज्या'चे (रिपब्लिक) आहे. म्हणजे भारताचा राष्ट्रप्रमुख वंशपरंपरेने सत्तेवर येत नाही, तर जनतेमार्फत निवडला जातो.

**सामाजिक तत्त्वज्ञान**

सरनाम्यामध्ये सामाजिक, आर्थिक व राजकीय न्यायस्थापनेची तत्त्वे सांगितली आहेत. दर्जा व संधी यांबाबत समता सांगितली आहे.

**आर्थिक तत्त्वज्ञान–लोकशाही समाजवाद**

सरनाम्यामध्ये १९७६ च्या ४२ व्या घटनादुरुस्तीद्वारे 'समाजवादी' हा शब्द घालण्यात आला. समाजवाद म्हणजे सर्वांना समान आर्थिक संधी प्राप्त करून देणे. महत्त्वाचे आर्थिक उद्योग, संस्था राष्ट्राच्या मालकीच्या असणे व व्यक्तिस्वातंत्र्यासाठी पूरक आर्थिक व्यवस्था निर्माण करून आर्थिक विषमता नष्ट करणे, हा समाजवादाचा अर्थ अभिप्रेत आहे.

राज्यघटनेच्या अमलापासूनच काँग्रेस पक्षाने लोकशाही समाजवादाचा स्वीकार केला होता. १९५५ च्या आवडी येथील काँग्रेसच्या अधिवेशनामध्ये समाजवादी समाजरचनेच्या स्थापनेची औपचारिक घोषणा करण्यात आली होती. प्रत्यक्ष व्यवहारामध्ये पं. नेहरूंनी 'मिश्र अर्थव्यवस्थे'चा पुरस्कार करून सरकारी (सार्वजनिक) व खासगी क्षेत्रांना वाव दिला होता. पंचवार्षिक योजनांची सुरुवात १९५१ पासून करण्यात आली व त्यांमध्ये सरकारी क्षेत्रातील गुंतवणूक वाढविण्यात आली. सुरुवातीला सरनाम्यामध्ये 'समाजवादी' हा शब्द नसला, तरी पं. नेहरू व काँग्रेसपक्षाने ही विचारधारा स्वीकारून आर्थिक समता निर्माण करण्याच्या दृष्टीने प्रत्यक्ष प्रयत्न सुरू केले होते. भारतामध्ये आर्थिक लोकशाही स्थापन करण्याच्या दृष्टीने काँग्रेसची ही महत्त्वाची वाटचाल होती.

**धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व**

'धर्मनिरपेक्ष' हा शब्दसुद्धा १९७६ च्या ४२ व्या घटनादुरुस्तीने सरनाम्यामध्ये घालण्यात आला. धर्मनिरपेक्ष याचा अर्थ राज्याला कोणताही अधिकृत धर्म नसणे होय. सरकार किंवा राज्य कोणत्याही धर्माला बांधलेले राहणार नाही. राज्यात औपचारिक रीत्या कोणताही

अनुक्रमणिका

धर्म नसतो. राज्यघटनेमध्ये 'धर्मनिरपेक्ष' हा शब्द कोठेही नव्हता; परंतु पं. नेहरू व काँग्रेस पक्षाच्या विचारसरणीच्या प्रभावामुळे राज्यघटनेतील कलम २५ ते २८ मध्ये धर्मनिरपेक्ष राज्यामध्ये अपेक्षित असलेल्या धर्मस्वातंत्र्यासंबंधीची तरतूद करण्यात आली होती.

भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने सुरुवातीपासूनच धर्मनिरपेक्षतेचा पुरस्कार केला होता. स्वतंत्र भारताच्या उभारणीमध्ये धार्मिक भेदभावांना थारा राहू नये, बहुसंख्याकांकडून अल्पसंख्याकांवर अन्याय होऊ नये, त्यांना संरक्षण मिळावे, धर्मा-धर्मामध्ये भेदभाव न ठेवता सर्वांना समान धार्मिक अधिकार देऊन धर्मनिरपेक्षतेची प्रवृत्ती बळकट करण्याचा प्रयत्न काँग्रेसने केला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रभावामुळे 'अस्पृश्यता बंदी'च्या कलम १७ मधील तरतुदीमुळे सामाजिक न्यायाच्या स्थापनेला बळकटी आली. काँग्रेसने नेहमीच समता, बंधुत्व, राष्ट्राची व व्यक्तीची प्रतिष्ठा, एकात्मता व अखंडत्व या तत्त्वांवर भर दिल्यामुळेच राज्यघटनेत व प्रत्यक्ष व्यवहारात ही तत्त्वे प्रस्थापित झाली आहेत.

नेहरू रिपोर्ट व काँग्रेसच्या आग्रहामुळे राज्यघटनेत १९७८ पर्यंत सात तर सध्याच्या सहा मूलभूत अधिकारांचा समावेश झाला. यामध्ये समतेचा, स्वातंत्र्याचा, शोषणाविरुद्धचा, धार्मिक स्वातंत्र्याचा, सांस्कृतिक व शैक्षणिक तसेच घटनात्मक उपाययोजनेचे मूलभूत अधिकार आहेत.

**काँग्रेस व संस्थात्मक विकास**

काँग्रेसने नेहमीच ब्रिटिश सरकारकडे संघराज्य, संसदीय शासनपद्धती, स्वतंत्र न्यायव्यवस्था इ. ची मागणी केली. यामुळेच या संस्थांचा, शासनांगांचा विकास भारतात झाला आहे. काँग्रेसने केंद्र सरकार व राज्य सरकार यांची व्यवस्था असावी, अशी मागणी केली होती. यातूनच स्वातंत्र्यानंतर संघराज्यात्मक शासनव्यवस्थेचा ढाचा तयार करण्यात आला. राज्यघटनेत कोठेही 'संघराज्य' हा शब्द नाही. त्याऐवजी राज्यघटनेच्या पहिल्या कलमामध्ये 'भारत हा 'राज्यांचा संघ' असेल', असा उल्लेख आहे. केंद्रोत्सारी प्रकारातून भारतीय संघराज्य अस्तित्वात आले असून प्रबळ केंद्र सरकार व स्वायत्त घटक राज्य सरकारे अस्तित्वात आली. अर्थात अमेरिकेप्रमाणे आदर्श संघराज्याचे स्वरूप भारतामध्ये नाही. राष्ट्रीय एकात्मता व अखंडत्व ठेवण्याच्या दृष्टीने प्रबळ अशा केंद्राची निर्मिती केली आहे. घटकराज्यांमध्ये राज्यसरकारे असून केंद्र व राज्यांमध्ये तपशीलवारपणे अधिकारविभागणी केली आहे.

**संसदीय शासनपद्धती व संसदेचे सार्वभौमत्व आणि स्वतंत्र न्यायमंडळ**

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारताने संसदीय शासनपद्धती स्वीकारावी की अध्यक्षीय शासनपद्धती स्वीकारावी, या बाबतीत घटना समितीमध्ये प्रदीर्घ चर्चा झाली. पं. नेहरू, सरदार पटेल व काँग्रेसच्या बहुतांश नेत्यांनी भारतासाठी संसदीय शासनपद्धती योग्य आहे व याच शासनपद्धतीचा स्वीकार करावा, यासाठी आग्रह धरला व अंतिमतः संसदीय शासनपद्धतीचा स्वीकार झाला. 'संयुक्त रीत्या जबाबदारीचे तत्त्व' या पद्धतीमध्ये आहे. काँग्रेस ब्रिटिश सरकारकडे जबाबदार शासनपद्धतीची मागणी करीत होते. पं. नेहरू, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी संसदीय शासनपद्धतीचे महत्त्व वारंवार स्पष्ट केले.

भारतामध्ये प्राचीन काळापासून संसदीय परंपरा होत्या. पं. नेहरू म्हणतात, 'आम्ही ही संसदीय व्यवस्था मुद्दाम निवडली; कारण ती आमच्या संस्कृतीला जवळची आहे. शिवाय ती जुनाट व निरर्थक अशी नसून नवीन परिस्थितीनुरूप सुयोग्य बदल करून ती आपण घेतली आहे. शेवटी महत्त्वाचे म्हणजे ज्यांच्याकडून आपण ती उचलली आहे, त्या ब्रिटिश लोकांचाही उल्लेख करणे जरूर आहे. कारण आधुनिक काळात इंग्लंडला संसदीय व्यवस्थेची जननी मानतात.'

पं. नेहरूंनी स्वतंत्र भारतामध्ये संसदीय परंपरा रुजविण्याचा व त्या समृद्ध करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. पं. नेहरूंनी पंतप्रधानपदाचा एक स्वतःचा आदर्श निर्माण केला. ते संसदेमध्ये नियमितपणे ठरावीक वेळेला उपस्थित राहत, चर्चेत सहभागी होत, विरोधी पक्षाचा आदर राखत होते. यामुळे संसदेत जनतेच्या आकांक्षा, अडीअडचणी इ. ची सविस्तर चर्चा होत असे. काँग्रेस पक्षाच्या या भूमिकेमुळे अल्पावधीमध्ये संसदेची लोकप्रियता वाढली याचा फायदा काँग्रेस पक्षाला झाला. १९७८ ते १९८० या कालावधीमधील जनता पक्षाचा अपवाद वगळता १९८९ पर्यंत केंद्रात काँग्रेसची सत्ता राहिली.

पं. नेहरूंच्या काळात राष्ट्रपती व पंतप्रधान या पदामधील आदर व समन्वय दोन्हीही बाजूंनी राखला गेला.

**संसद व सर्वोच्च न्यायालय**

पं. नेहरूंच्या काळात या दोन्ही महत्त्वाच्या संस्थांमध्ये किंवा शासनांगांमध्ये अत्यंत चांगले संतुलन राखले गेले. या काळातील न्या. पतंजलिशास्त्री, महाजन, मुखर्जी, एस. आर. दास यांनी संसदेबरोबर थेट संघर्ष टाळून अतिशय सावधगिरीने न्यायमंडळाची अधिसत्ता वाढविण्याचा प्रयत्न केला. गोपालन, शंकरीप्रसाद, रोमेश थापर इ. खटल्यांत निर्णय देताना सर्वोच्च न्यायालयाने न्यायालयीन पुनर्विलोकन, प्रदत्त अधिकार इ. संकल्पना स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. गोपालन खटल्यामध्ये न्यायालयाने अशी भूमिका घेतली होती, की सामान्य कायद्याद्वारे मूलभूत अधिकारांचा संकोच संसदेला करता येणार नाही. मात्र घटनादुरुस्ती केलेल्या कायद्यांना घटनेतील कलम १३ (२) लागू होणार नाही. या ठिकाणी न्यायालयाने फारशी तक्रार न करता संसदेचा हक्क मान्य केला होता.

**काँग्रेस पक्ष व जमीनदारी निर्मूलन कायदे – नववे परिशिष्ट**

भारतामध्ये जमीनदारीचे निर्मूलन व्हावे व सामाजिक न्याय प्रस्थापित व्हावा, हे स्वातंत्र्य चळवळीमधील नेत्यांचे व काँग्रेस पक्षाचे जनतेला दिलेले वचन होते. याला अनुसरून पं. नेहरूंच्या कालखंडात जमीनसुधारणाविषयक कायदे करण्यात आले. या कायद्यांना सर्वोच्च न्यायालयात आव्हान देता येऊ नये म्हणून १९५१ मध्ये राज्यघटनेत पहिली घटनादुरुस्ती करून कलम ३१ (ब) आणि नवव्या परिशिष्टाचा समावेश केला. या परिशिष्टामधील सर्व कायदे न्यायालयीन पुनर्विलोकनापासून मुक्त ठरविले. जमीनदारी निर्मूलनविषयक या कायद्यामुळे कोणाच्या मूलभूत अधिकारांचा संकोच होत असला, तरी ते रद्द ठरविण्याचा अधिकार सर्वोच्च न्यायालयाला ठेवला नाही. यामुळे अनेक राज्यांनी जमीनसुधारणाविषयक कायदे केले व ते अमलात आणले. थोडक्यात, काँग्रेसने स्वातंत्र्य चळवळीतील वचनपूर्ततेसाठी नववे परिशिष्ट जोडून जमीनसुधारणाविषयक कायदे केले.

परंतु दि. ११ जानेवारी २००७ रोजी आय. आर. कोईल्हो वि. तामिळनाडू या खटल्याचा निर्णय देताना सरन्यायाधीश वाय. के. सभरवाल यांनी स्पष्ट केले, की नवव्या परिशिष्टाचा गैरवापर सत्ताधारी पक्षांनी केला असून केशवानंद खटल्याचा निर्णय तारखेपासून म्हणजे दि. २४ एप्रिल १९७३ नंतर नवव्या परिशिष्टामध्ये समाविष्ट केलेल्या सर्व कायद्यांचे परीक्षण सर्वोच्च न्यायालय करू शकते. या निर्णयामुळे संसदेच्या सार्वभौमत्वावर अंकुश आला आहे व कोर्टाने 'पायाभूत चौकट' हे तत्त्व पक्के केले. पं. गोविंद वल्लभ पंत, पं. नेहरूंनी न्यायालय हे संसदेचे तिसरे सभागृह नाही, असे मत व्यक्त केले होते. नेहरूंच्या मते, 'संसद ही धोरणाबाबत सार्वभौम असते.' नेहरूंनी निर्माण केलेली उच्च दर्जाची संसदीय परंपरा जोपासण्याची, संसदेच्या सतर्कतेची आज अतिशय गरज आहे.

**काँग्रेस पक्ष आणि १९५२, १९५७ व १९६२ च्या लोकसभा निवडणुका व जाहीरनामे**

स्वातंत्र्यानंतर पं. नेहरूंच्या काळात लोकसभेसाठी तीन निवडणुका झाल्या. काँग्रेस पक्षाने प्रत्येक निवडणुकीसाठी जाहीरनामे प्रसिद्ध केले. या जाहीरनाम्यांच्या विश्लेषणातून आपणास काँग्रेसच्या धोरणाची वाटचाल लक्षात येते.

अ) राजकीय क्षेत्र

स्वातंत्र्य मिळाले असले, तरी फाळणीचा प्रश्न गंभीर होता. विस्थापितांचा प्रश्न सोडवून राष्ट्रीय एकात्मतेवर भर देण्याचे आश्वासन १९५२ व १९५७ च्या निवडणूक जाहीरनाम्यांमध्ये दिले. 'धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व' स्वीकारून पक्षाने वाटचाल केली. पोर्तुगीजांपासून गोवामुक्तीसाठी शांततामय मार्गाने प्रयत्न केले व गोवा मुक्त करून तो भारताचा भाग बनविला.

ब) सामाजिक क्षेत्र

या क्षेत्रामध्ये अनुसूचित जाती व जमातींचा सांस्कृतिक विकास करण्याचे आश्वासन दिले. आदिवासींच्या संस्कृतिरक्षणाची हमी दिली. १९५७ च्या जाहीरनाम्यात प्रत्येक भाषेला संरक्षण दिले व भाषिक प्रश्न सोडविण्यासाठी फाजल अली यांच्या अध्यक्षतेखाली आयोग नेमला. धर्मनिरपेक्षतेला महत्त्व दिले.

क) आर्थिक क्षेत्र

१९५७ च्या जाहीरनाम्यात स्पष्टपणे 'समाजवादी समाजरचना निर्मिती'ची घोषणा केली. आर्थिक क्षेत्रात समता आणण्यासाठी कार्यक्रम राबविले. स्टेट बँक ऑफ इंडिया, विमाक्षेत्र यांचे राष्ट्रीयीकरण केले. मोठ्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण केले. अशा उद्योगांना चालना दिली. सहकार चळवळीला पाठिंबा दिला.

ड) शैक्षणिक क्षेत्र

या क्षेत्रामध्ये भारतापुढे अनेक आव्हाने होती. काँग्रेसने शिक्षणावर व यामध्ये प्रामुख्याने तांत्रिक शिक्षणावर आणि वैज्ञानिक संशोधनावर भर दिला. १९६२ च्या जाहीरनाम्यामध्ये लहान मुलांना सार्वत्रिकपणे मोफत शिक्षणाची घोषणा केली.

इ) शेतीक्षेत्र

जमीनदारी, जहागीरदारी निर्मूलन करण्यासाठी कायदे केले. कमाल जमीन धारणा कायदा अमलात आणण्याचे वचन दिले. शेतीक्षेत्रामध्ये आधुनिक तंत्रे, बी-बियाणे वापरण्यावर भर दिला. १९५१ च्या पहिल्या पंचवार्षिक योजनेमध्ये शेतीसुधारणेवर भर दिला.

फ) महिला धोरण

काँग्रेसने गांधींच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्य चळवळीमध्ये स्त्रियांचा सहभाग वाढविला होता. स्वातंत्र्यानंतर स्त्रियांचा राजकीय व सामाजिक क्षेत्रांमध्ये सहभाग वाढविण्यावर काँग्रेसने भर दिला. १९५७ च्या जाहीरनाम्यात हिंदू कायद्यामधील विवाह व घटस्फोटाबाबत सुधारणा करण्याचे आश्वासन दिले.

ज) परराष्ट्र धोरण

काँग्रेसच्या या काळातील सर्वच जाहीरनाम्यांमध्ये आंतरराष्ट्रीय शांतता, सर्व देशांबरोबर मैत्रीपूर्ण संबंध यावर भर दिला. १९५५च्या बांडुंग परिषदेमध्ये पं. नेहरू व चौ-एन-लाय एकत्र आले व नेहरूंच्या 'पंचशील तत्त्वांचा' स्वीकार केला. भारताने शीतयुद्ध, वसाहतवाद, वंशवाद, लष्करी स्पर्धा इ. ना विरोध दर्शविला व १९६२ च्या जाहीरनाम्यात 'अलिप्तता चळवळ' धोरणाचा स्वीकार केला.

काँग्रेसच्या वरील धोरणांस जनतेने भरघोस पाठिंबा दिला. त्यामुळे काँग्रेसचे १९५२ च्या निवडणुकीत ३६४ उमेदवार, १९५७ मध्ये ३७१, तर १९६२ मध्ये ३६१ उमेदवार निवडून आले. या ठिकाणी एक बाब निश्चित मान्य करावी लागते, ती म्हणजे गांधीजींच्या नंतर या कालखंडावर नि:संदिग्धपणे पं. नेहरूंचा प्रभाव होता.

**समारोप**

१९३६ ते १९६० हा कालखंड काँग्रेसच्या व देशाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा व संवेदनशील कालखंड आहे. भारताला स्वातंत्र्य मिळत असतानाच भारतामध्ये भारतीयांचे शासन कसे प्रस्थापित करता येईल, हा महत्त्वाचा प्रश्न होता. काँग्रेसने घटनासमितीच्या माध्यमातून कायदेपंडितांच्या सहभागातून अतिशय उत्तम, आदर्श अशी राज्यघटना तयार केली. ग्रॅनव्हिले ऑस्टीन या राज्यघटनेला 'सामाजिक दस्तऐवज' म्हणतात. ही राज्यघटना गेल्या ६० वर्षांमध्ये अनेक पातळ्यांवर सिद्ध झाली आहे.

स्वातंत्र्य मिळत असतानाच फाळणीचा प्रचंड मोठा आघात देशाला सोसावा लागला. काँग्रेसने धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व अवलंबून अखंड व एकात्म भारत निर्माण करण्याचे अवघड आव्हान यशस्वी केले. अल्पसंख्याक, विस्थापितांच्या मनात स्थैर्याची भावना विकसित करण्यामध्ये काँग्रेस यशस्वी ठरली. समाजवादी समाजरचनानिर्मितीचे ध्येय निश्चित करून आर्थिक, सामजिक न्यायप्रस्थापनेचा चांगला प्रयत्न केला.

या नव्याने स्वतंत्र झालेल्या देशामध्ये लोकशाहीचा पुरस्कार करून लोकशाही मूल्ये, संसदीय मूल्ये यशस्वीपणे रुजविली. आज भारत हा जगात सर्वांत मोठा लोकशाही देश होण्यामध्ये काँग्रेसचे निश्चितच योगदान आहे.

आजच्या दहशतवादाच्या, मूलतत्त्ववादाच्या संकटाला समर्थपणे तोंड देण्याची क्षमता काँग्रेसच्या धर्मनिरपेक्ष तत्त्वामुळेच निर्माण झाली आहे. २१ व्या शतकामधील एक शक्तिशाली व लोकशाहीवादी राष्ट्र म्हणून भारताचा गौरव होतो आहे, हे काँग्रेस पक्षाच्या एकशे पंचवीस वर्षांच्या तत्त्वज्ञानाचे, त्यागाचे, भूमिकेचे फलित आहे.

☆☆☆

# भारतीय राष्ट्रीय काँग्रेस : प्रारंभीचा काळ

डॉ. अवनीश पाटील

मुंबईच्या गोवालिया टँक मैदानावरच्या गोकुळदास तेजपाल संस्कृत पाठशाळेच्या सभागृहात भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनात सहभागी होण्यासाठी २८ डिसेंबर १८८५ रोजी अवघे ७२ प्रतिनिधी एकत्र आले. पण पुढील काळात भारताला ब्रिटिश राजवटीपासून स्वातंत्र्य मिळवून देण्यामध्ये काँग्रेसने महत्त्वाची भूमिका पार पाडली. स्वातंत्र्योत्तर काळामध्ये काँग्रेसचे रूपांतर एका राजकीय पक्षामध्ये झाले.

भारतीय राष्ट्रीय चळवळीच्या बहुतेक इतिहासांची सुरुवात १९ व्या शतकाच्या शेवटच्या २-३ दशकांपासून केली जाते. खरंतर हा इतिहास म्हणजे भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचाच इतिहास असे म्हटले, तर चुकीचे ठरणार नाही. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसबरोबर संबंधित असलेल्या सर्व घटना भारतीय राष्ट्रवादाच्या विकासाचा एक भाग मानल्या जातात. भारतीय राष्ट्रीय काँग्रेस ही पहिली राजकीय संघटना होती, जी अखिल भारतीय पातळीवर अस्तित्वात आली होती व सर्व भारतीय लोकांचे प्रतिनिधित्व करीत होती. या आधीच्या राजकीय संघटना जमीनदार, बंगाली लोक, हिंदू किंवा मुस्लिम अशा धार्मिक अथवा प्रादेशिक गटांचे प्रतिनिधित्व करत होत्या.

इतिहासकार काँग्रेसची पहिली वीस-पंचवीस वर्षे (१८८५-१९१०) एकत्रित अभ्यासतात, याचे प्रमुख कारण म्हणजे साधारणतः या वर्षांमध्ये काँग्रेसवर मवाळ नेत्यांचा प्रभाव होता. असे करणे एका अर्थाने बरोबरच होते; कारण काँग्रेसच्या सुरुवातीच्या वीस वर्षांतील हेतू व कार्यामध्ये साम्य दिसून येते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला भारतीय राष्ट्रवादामध्ये जहाल प्रवृत्तीचा उदय झाला व १९०५ च्या बनारस अधिवेशनापासून काँग्रेसमधील मवाळ व जहाल नेत्यांमध्ये संघर्ष सुरू झाला.

**काँग्रेसची स्थापना**

काँग्रेसचे पहिले अधिवेशन आयोजित करण्याचे श्रेय ॲलन ऑक्टेवियन ह्यूमला (१८२९-१९१२) जात असले, तरी अशा प्रकारची संघटना स्थापन करण्याची मूळ कल्पना ह्यूमसाहेबांचीच होती, असे समजणे चुकीचे ठरेल. १८८० च्या दशकात एखादी 'राष्ट्रपातळीवरील संघटना' स्थापन करण्याची कल्पना सुरेंद्रनाथ बॅनर्जी, सीतारामपंत चिपळणूकर यांच्यासारख्या पुढाऱ्यांच्या मनात घोळत होती. १८८५ सालच्या जानेवारी-फेब्रुवारी महिन्यांत कलकत्त्याच्या 'इंडियन मिरर' पत्राचे संपादक नरेंद्रनाथ सेन यांनी अशीच एक 'राष्ट्रसभा' भरवण्याची योजना आपल्या संपादकीय लेखांमधून मांडलीदेखील होती.

ॲलन ह्यूम हे उदारमतवादी विचारांचे एक सेवानिवृत्त सनदी अधिकारी होते. त्यांनी ब्रिटिश प्रशासनात जिल्हाधिकारी, मुख्य आयुक्त, गृह, कृषी व व्यापारखात्याचे सचिव म्हणून कार्यभार सांभाळलेला होता. त्यांचे विचारदेखील भारताचे उदारमतवादी गव्हर्नरजनरल लॉर्ड रिपन यांच्या विचारांशी मिळतेजुळते होते. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात उदयास आलेल्या शिक्षितांच्या वर्गाचे राजकीय अस्तित्व मान्य करून ह्या वर्गाची ब्रिटिश राजवटीबद्दलची गाऱ्हाणी व तक्रारी मांडण्यासाठी एक राजकीय मंच उपलब्ध करून देणे गरजेचे होते, असे ह्या दोन्ही अधिकाऱ्यांना वाटत होते. थोडक्यात, ब्रिटिश राजवटीमुळे निर्माण झालेल्या असंतोषाला वाट देण्यासाठी एक देशव्यापी संघटना स्थापन करून तिचा एखाद्या सुरक्षितता झडपेसारखा उपयोग होईल, असे ह्यूमसाहेबांना वाटत होते. ह्यूम यांनी भारतीय वंशाच्या उच्चशिक्षित लोकांशी जवळचे संबंध प्रस्थापित केले होते. १८८४ सालच्या डिसेंबर महिन्यात ह्यूमसाहेब लॉर्ड रिपनला निरोप देण्यासाठी मुंबईला आले व पुढील तीन-चार महिने त्यांनी मुंबईत वास्तव्य केले. या काळात त्यांनी मुंबई प्रांतातील प्रभावी भारतीय पुढाऱ्यांशी चर्चा केली. उच्चशिक्षित भारतीय लोकांनी कोणत्या प्रकारे राजकीय कार्याचा कार्यक्रम हाती घेतला पाहिजे, हा त्यांच्या चर्चेचा प्रमुख विषय होता. मार्च १८८५ मध्ये 'इंडियन नॅशनल

युनियन'चे अधिवेशन पुणे येथे डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात घेण्याचे ठरले. सुरुवातीला ह्यूम आणि त्यांच्या सहकाऱ्यांना असे वाटत होते, की हे अधिवेशन कलकत्ता येथे घेणे जास्त सोयीचे ठरेल. पण नंतर पुणे शहराच्या नावावर शिक्कामोर्तब करण्यात आले; कारण पुणे हे भौगोलिक दृष्ट्या केंद्रस्थानी होते व पुण्याच्या सार्वजनिक सभेने अधिवेशनाची सर्व तयारी करण्याची व लागणारा निधी उपलब्ध करून देण्याची तयारी दर्शविली होती. मात्र नियतीला असे होणे मान्य नव्हते; कारण पुण्यामध्ये पटकीची साथ सुरू झाली आणि अधिवेशनाचे स्थळ अचानकपणे मुंबईला हलविण्यात आले.

काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होण्याचा मान बंगालचे ज्येष्ठ नेते उमेशचंद्र बॅनर्जी यांना मिळाला. ते भारतातील पहिल्या चार बॅरिस्टरमधील एक होते व नामवंत कायदेपंडित होते. बॅनर्जी यांच्या निवडीमुळे काँग्रेस अध्यक्षपदाच्या निवडीबाबत एक महत्त्वाचा पायंडा प्रस्थापित झाला. काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाचे अध्यक्ष हे ज्या प्रांतात अधिवेशन घेतले जात आहे, त्या प्रांतातून न निवडता इतर प्रांतांतून निवडण्याचा प्रघात सुरुवातीपासूनच अस्तित्वात आला.

बॅनर्जी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात काँग्रेसचे हेतू खालीलप्रमाणे स्पष्ट केले –

१) भारतीवासीयांमध्ये मित्रत्वाचे नाते व जवळीक निर्माण करणे.

२) लोकांमधले जातपात, वंश व प्रांत यांसंबंधीचे पूर्वग्रह नष्ट करणे.

३) राष्ट्रीय एकतेची भावना जोपासणे.

४) ज्वलंत व अतिमहत्त्वाच्या प्रश्नांसंबंधी शिक्षित वर्गाच्या मतांची नोंद करणे.

५) लोकहित साधण्यासाठी पुढील कार्याची दिशा ठरवणे.

उमेशचंद्र बॅनर्जी यांनी आपल्या भाषणात 'ब्रिटिश राजवट भारतासाठी एक दैवी देणगी' कशा प्रकारे ठरली होती याचेदेखील वर्णन केले. त्यांनी शिक्षित वर्गाच्या ब्रिटिश राजवटीला असलेल्या निष्ठेची ग्वाही दिली. त्यांनी असे मत मांडले, की काँग्रेसच्या स्थापनेचा प्रमुख हेतू हा भारतवासीयांचे विचार ब्रिटिश अधिकाऱ्यांपर्यंत पोचवणे हा होता व काँग्रेसला ब्रिटिशांच्या विरोधात कटकारस्थान करणारी किंवा राजद्रोह चेतवणारी संघटना समजू नये.

पहिल्या अधिवेशनाचे कामकाज अतिशय शिस्तबद्ध पद्धतीने चालले. प्रत्येक ठरावावर लोकशाही पद्धतीनुसार चर्चा झाल्यावर तो मंजूर करण्यात आला. ठराव एका प्रांतामधील प्रतिनिधींनी मांडला की दुसऱ्या प्रांतामधील प्रतिनिधींनी त्याचे अनुमोदन करायचे व इतर प्रांतांतील प्रतिनिधींनी त्याला पाठिंबा द्यायचा, अशी पद्धत स्वीकारली गेली. इतिहासकार ब्रिटोन मार्टिन यांच्या मते काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाचे कामकाज एवढ्या व्यावसायिकपणे पार पाडले गेले, की त्या काळातील इंग्लंड किंवा अमेरिकेतील राजकीय संघटनांनादेखील त्याचा हेवा वाटला असता. पहिल्या अधिवेशनात नऊ ठराव मंजूर केले गेले : हिंदुस्थानातील कारभाराची पाहणी करण्यासाठी इंग्लंडच्या राणीने एक आयोग नेमावा व त्यामध्ये हिंदुस्थानातील लोकांना योग्य प्रतिनिधित्व द्यावे; लंडनमधील भारतमंत्र्याचे सल्लागार मंडळ बरखास्त करावे; लष्करावर होणारा खर्च कमी करावा; कायदेमंडळातील लोकनियुक्त सभासदांची संख्या वाढवावी आणि त्यांचे अधिकार वाढवावेत; सनदी सेवेत प्रवेश करण्यासाठी स्पर्धात्मक परीक्षा इंग्लंडमध्ये व हिंदुस्थानात एकाच वेळेस घ्याव्यात या मागण्या करणारे हे ठराव होते. याचबरोबर ब्रिटिश राजवट चिरस्थायी व्हावी, असे आपल्याला वाटत असल्याची राजनिष्ठ घोषणाही केली गेली.

याशिवाय काँग्रेसने दोन महत्त्वाचे निर्णय घेतले. अधिवेशनात संमत केलेले सर्व ठराव देशातील इतर राजकीय संघटनांकडून मंजूर करून घेण्यासाठी प्रयत्न करायचे आणि पुढील काँग्रेसचे अधिवेशन २८ डिसेंबर १८८६ रोजी कलकत्ता शहरात घेण्याचे ठरले. हे दोन निर्णय आपल्याला हे दर्शवतात, की हिंदुस्थानातील नेतेमंडळी काँग्रेस अधिवेशनाकडे एक अलग अलग घटना अशा दृष्टिकोणातून पाहत नव्हती. त्यांना पूर्ण जाणीव होती, की त्यांनी एका चळवळीची सुरुवात केली होती.

१८८५ ते १८९२ च्या सुरुवातीच्या वर्षांमध्ये ह्यूम हे काँग्रेसचे सरचिटणीस व काँग्रेसचे कामकाज पाहणारे पूर्णवेळ कार्यकर्ते होते. या टप्प्यात काँग्रेसच्या सदस्यसंख्येत

जलदगतीने वाढ होत गेली. ह्यूम यांनी मुस्लिम लोकांचा पाठिंबा मिळवण्यासाठी १८८७-८८ साली प्रयत्न केले. त्यांनी बद्रुद्दीन तयाबजी यांचे मुस्लिम नेत्यांबरोबरचे संबंध वापरून काँग्रेसच्या १८८७ च्या अधिवेशनात एक सूत्र ठरवून घेतले; ज्याच्यामुळे एखाद्या समूहाच्या बहुतांश लोकांचा जर कुठल्या ठरावाला विरोध असेल, तर तो ठराव संमत केला जाणार नाही. ह्यूम यांनी १८८७ च्या काँग्रेस अधिवेशनात शेतकऱ्यांचा पाठिंबा मिळवण्याचा प्रयत्न केला. त्यांनी दोन लहान पुस्तिका १२ स्थानिक भाषांमध्ये भाषांतरित करून घेतल्या. स्वतः ह्यूम यांनी त्यांतील एक पुस्तिका लिहिली होती. ह्या पुस्तिकेमध्ये ह्यूम यांनी खेडेगावांमधील शेतकऱ्यांच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनी चालवलेल्या पिळवणुकीचे वर्णन केले.

१८९० चे दशक हे काँग्रेसला अडचणीचे होते. या दशकात काँग्रेस नेतृत्वाला गटबाजीने ग्रासले होते. बंगालमध्ये सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांच्या '*बंगाली*' या वृत्तपत्राचा मोतीलाल घोष यांच्या *अमृत बाजार* पत्रिका या वृत्तपत्राशी संघर्ष होत होता. पंजाबमध्ये लाहोर आर्यसमाज तीन गटांत विभागला होता व लाला हरकिशन, लाल आणि लाला लजपतराय यांच्यामध्ये टकराव निर्माण झाला होता. महाराष्ट्रामध्ये बाळ गंगाधर टिळक यांचे गोखले व आगरकर यांच्याबरोबरचे संबंध दुरावलेले होते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला भारताचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांच्या कारवायांमुळे मवाळ नेतृत्वामध्ये नवा जोम आला व जहालवादी नेतृत्वाचा उदय झाला.

## आरंभीच्या वर्षांतील काँग्रेसचे मवाळ स्वरूप

सुरुवातीच्या काळात (१८८५-१९०५) राष्ट्रीय काँग्रेसने देशातील निरनिराळ्या भागांतील नेत्यांना एकत्र येण्यासाठी एक व्यासपीठ उपलब्ध करून दिले. काँग्रेसचे अधिवेशन प्रत्येक वर्षी शेवटच्या महिन्यात तीन दिवसांसाठी घेतले जात असे. या अधिवेशनात काँग्रेसच्या अध्यक्षांची बहुतांश वेळेला [illegible] भाषेतून मोठमोठी भाषणे होत असत आणि [illegible] ठरावदेखील मंजूर केले जात असत. काँग्रेस जरी संपूर्ण देशाचे प्रतिनिधित्व करीत होती, तरी काही वर्गांच्या, जातीच्या, धंद्याच्या व प्रांतांच्या नेत्यांचे प्रतिनिधित्व इतरांपेक्षा जास्त ठळकपणे दिसत होते. सुशिक्षित मध्यमवर्ग मोठ्या संख्येने सहभागी झाला होता. ब्राह्मण जातीचे प्रतिनिधी पण इतर जातींच्या मानाने खूप होते. काही पत्रकार, डॉक्टर व शिक्षक सभासद होते, तरी धंद्यांमध्ये वकिलीचा पेशा करणाऱ्यांचा वरचष्मा होता. तसेच मुंबई, बंगाल व मद्रास या प्रांतांमधून येणाऱ्या सभासदांची संख्या देशाच्या इतर भागांतून येणाऱ्यांपेक्षा खूप जास्त होती. सर्वसामान्य जनता व शेतीवर अवलंबून असणारा मोठा वर्ग यांची गैरहजेरी मात्र डोळ्यात भरत होती. १८९५ सालच्या अधिवेशनात काँग्रेसच्या मांडवासमोरच सत्यशोधक नेते कृष्णराव भालेकरांनी एका दुष्काळपीडित मनुष्याचे चित्र उभे करून त्याच्या हातात दिलेल्या फडक्यावर "सभेत शेतकऱ्यांची खरी कळकळ बाळगणारे वीसतरी लोक आहेत काय?" असा प्रश्न लिहिला होता. थोडक्यात, काँग्रेस ही जणूकाही मध्यमवर्गाची उठाठेव होती. परंतु हे नैसर्गिक होते; कारण मध्यमवर्गानेच तर काँग्रेसच्या स्थापनेत कळीची भूमिका निभावलेली होती.

प्रारंभीच्या काळात काँग्रेसचे स्वरूप मवाळ का होते, हे समजणे जरुरीचे आहे. बहुतांश काँग्रेस नेत्यांनी इंग्रजी शिक्षण घेतलेले होते व त्यांच्या जीवनशैलीवर पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव होता. जवळजवळ सर्वजण आपापल्या व्यवसायांत यशस्वी झालेले होते. यामुळे त्यांना काँग्रेसच्या कार्यासाठी आपला पूर्ण वेळ अर्पण करता येत नव्हता. काँग्रेसचे नेतृत्व पाश्चात्त्य जीवनपद्धतीशी आचाराने व मनाने जुडलेले होते. त्यांचा ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर विश्वास होता व त्यांना त्यांच्याबद्दल कृतज्ञता वाटत होती. त्यांचा असा समज होता, की इंग्रजी शिक्षणामुळेच त्यांना स्वातंत्र्य, समता, लोकशाही, व्यक्तीचा आत्मसन्मान या अभिनव मूल्यांची ओळख झाली. तसेच ब्रिटिश राजवटीमुळेच कायद्याचे राज्य व कार्यक्षम प्रशासन देशात निर्माण झाले. सुरुवातीच्या काळातील काँग्रेसच्या मवाळ नेत्यांचे प्रामाणिक मत होते, की ब्रिटिश अमलाखाली भारतीय जनतेला बरेच काही फायदे झाले होते आणि म्हणूनच त्यांना ब्रिटिश राजवटीबद्दल निष्ठा वाटत होती. पण याचा अर्थ मवाळ नेते राष्ट्रवादी किंवा देशभक्त नव्हते, असा होत नाही. त्यांना फक्त ब्रिटिशांबरोबर राजकीय संघर्ष नको; होता पण त्यांना ब्रिटिश राजवटीत देशाच्या हिताचे रक्षण

जरूर करायचे होते. नंतरच्या काळात अनेक मवाळ नेत्यांना कळून चुकले, की ब्रिटिश राजवटीने देशाचे जेवढे हित केले आहे, त्यापेक्षा कितीतरी पटीने जास्त अहितच केले आहे. तेव्हा कुठे त्यांचे हृदयपरिवर्तन झाले व ते 'स्वराज्य व स्वयंप्रशासनाची' मागणी करू लागले.

काँग्रेसची संघटना नव्याने अस्तित्वात आलेली असल्यामुळे प्रारंभीच्या वर्षांमध्ये नेतृत्वाला आक्रमक कार्यक्रम हाती घेणे शक्य नव्हते. ब्रिटिश सरकारला संघटना दडपण्याचा कोणताही बहाणा मिळू नये, म्हणून एक मवाळ कार्यपद्धती राबवणे सुरुवातीच्या काळात तरी गरजेचे होते. इतिहासकार सुमित सरकार यांनी असे मत मांडले आहे, की काँग्रेसच्या सुरुवातीच्या नेतृत्वाचे मुंबई शहरामधील उद्योगपती, प्रसिद्ध व्यापारी घराणी, जमीनदार इत्यादी भांडवलदारवर्गाशी संबंध होते. ह्या भांडवलदारवर्गाकडून क्रांतिकारी अथवा जहाल कार्यक्रमाला व लोकचळवळीला पाठिंबा मिळण्याची शक्यता कमीच होती.

काँग्रेसच्या स्थापनेनंतर जवळजवळ पंचवीस वर्षे मवाळवादी गटाच्या नेत्यांनी काँग्रेसचे नेतृत्व केले. या गटात इंग्रजी शाळांतून शिकलेल्या प्रथमपिढीच्या भारतीयांचा भरणा होता. शिक्षणातून त्यांच्यावर पाश्चात्त्य आचार विचार व विशेषतः उदारमतवादी तत्त्वज्ञान यांचा प्रभाव पडलेला होता. पाश्चात्त्यांच्या कथनी आणि करणीतील फरकामुळे व ब्रिटिश सरकारच्या दडपशाहीमुळे त्यांना 'धर्मनिरपेक्ष कायद्याच्या राज्यात व्यक्तीसाठी स्वातंत्र्य व समता' या मागणीसाठी मंच उभारून लढा द्यावा लागला. मवाळमतवादी नेत्यांमध्ये दादाभाई नौरोजी, बद्रुद्दीन तयाबजी, फिरोजशहा मेहता, पी. आनंद चार्यलु, सुरेंद्रनाथ बॅनर्जी, रोमेशचंद्र दत्त, आनंद मोहन बोस, गोपालकृष्ण गोखले ही नावे प्रमुख होत. अन्य महत्त्वाच्या मवाळ नेत्यांमध्ये महादेव गोविंद रानडे, जी. सुब्रमण्यम अय्यर, दिनशा वाच्छा ही नावे येतात.

इतिहासकार बिपिनचंद्र यांनी मवाळमतवादी कार्यपद्धतीला 'ब्रिटिश कायद्याच्या मर्यादेमधील घटनात्मक चळवळ व हळुवार शिस्तबद्ध राजकीय प्रगती', असे म्हटले आहे. मवाळ नेत्यांनी जनतेवर प्रभाव पाडून जनमताचा कौल त्यांच्या मागण्या व कार्यपद्धतीच्या बाजूने करून घेतला. म्हणूनच तर भारतातील तसेच इंग्लंडमधील जनमत जागृत करण्यासाठी त्यांनी सभा बोलावणे, ठराव मंजूर करून घेणे, भाषणे करून प्रबोधन करणे इत्यादी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. इंग्लंडमध्ये लोकांना व ब्रिटिश संसदेलाही त्यांनी भारतातील खऱ्या अस्वस्थतेबद्दल सांगितले. ब्रिटिश जनमत आपल्या बाजूने करण्यासाठी इंग्लंडला एक विधिमंडळ १८८९ साली पाठवले व राष्ट्रीय काँग्रेस समितीची स्थापना केली. या समितीने १८९० साली 'इंडिया' नावाचे मासिक प्रसिद्ध करायला सुरुवात केली. दादाभाई नौरोजी यांनी तर आपल्या ध्येयासाठी जीवनातील महत्त्वाचा काळ भारतातील राजकीय सुधारणांसाठी ब्रिटिश लोकांचा व संसदेचा पाठिंबा मिळविण्यासाठी इंग्लंडमध्ये घालविला.

काँग्रेसच्या मवाळ नेतृत्वाने ब्रिटिश सरकारच्या सगळ्या महत्त्वाच्या धोरणांबाबत जनमत तयार करण्याचा कसोशीने प्रयत्न केला. प्रारंभीच्या काळात काँग्रेसच्या कार्यक्रमाचे तीन भाग पाडता येतात. १) सांविधानिक व प्रशासकीय सुधारणा, २) सामाजिक सुधारणा व नागरी हक्कांचे समर्थन, ३) आर्थिक सुधारणा.

काँग्रेसच्या मवाळवादी नेतृत्वाची एक प्रमुख मागणी होती, की लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये भारतीयांना उचित प्रमाणात प्रतिनिधित्व मिळावे व कौन्सिलच्या अधिकारांचादेखील विस्तार व्हावा. ब्रिटिश प्रशासनात सुधारणा करण्याची मागणीही त्यांनी जोर लावून धरली. त्यांच्या इतर मागण्या खालीलप्रमाणे होत्या :

१) ब्रिटिश प्रशासनातील सनदी सेवांमध्ये भारतीयांना जास्त प्रमाणात सामावून घेण्यात यावे.

२) प्रशासकीय व न्यायालयीन अधिकार एकमेकांपासून वेगळे असावेत.

३) प्राथमिक व उच्च शिक्षण तसेच तांत्रिक शिक्षणाचा विस्तार करावा.

४) कृषिक्षेत्रासाठी पतसंस्था स्थापन करून शेतकऱ्याची सावकारापासून सुटका करावी.

५) शेतीतील बागायती क्षेत्र वाढवून दुष्काळाला

आळा घालावा.

६) दवाखाने व आरोग्यसेवा स्थापन करावी.

७) भ्रष्ट, अकार्यक्षम व लोकप्रिय नसलेल्या पोलिसयंत्रणेमध्ये सुधारणा कराव्यात.

भारताबाहेरील ब्रिटिश आधिपत्याखालील प्रदेशांच्या प्रश्नावरदेखील काँग्रेस नेत्यांनी जोरकस मतप्रदर्शन केल्याचे आढळते. उदाहरणार्थ, ब्रह्मदेशाचे राज्य खालसा करून त्याला ब्रिटिश साम्राज्यास जोडण्याच्या कारवाईला त्यांनी विरोध केलेला होता. तर ब्रिटिश सरकारने अफगाणिस्तान व वायव्य सरहद्दीवर केलेल्या आक्रमणाचा त्यांनी निषेध केला होता. तसेच दक्षिण आफ्रिका, मलाया, मॉरीशस, वेस्ट-इंडिज आणि ब्रिटिश गयाना या देशांत गेलेल्या भारतीय वंशाच्या कामगारांची दुरवस्था सुधारण्याची मागणीपण काँग्रेसच्या मवाळ नेत्यांनी लावून धरली होती.

काँग्रेसच्या नेत्यांनी लोकशाही तत्त्वांशी पूर्ण बांधीलकी बाळगलेली होती. त्यांनी भारतीयांच्या नागरिकी हक्कांसाठी व समाजसुधारणांसाठी प्रयत्न केले. समाजातील वाईट रूढी, चालीरीती आणि मागासलेपण यांचा समूळ नायनाट करून स्वराज्यासाठी समाजाला लायक बनविण्यासाठी जोरदार चळवळीची आवश्यकता काँग्रेसच्या नेत्यांना जाणवत होती. त्यांनी भाषणस्वातंत्र्य, खुली पत्रकारिता, विचारस्वातंत्र्य आणि संघटनस्वातंत्र्य यांचा पुरस्कार व समर्थन केले आणि जनमानसात सामाजिक सुधारणा, लोकशाही, नागरी हक्क या विषयांच्या संकल्पना प्रचलित केल्या.

ब्रिटिश सरकारच्या वसाहतवादी आर्थिक धोरणांवर व व्यवहारावर मवाळ नेत्यांनी समीक्षात्मक टीका केली. वसाहतवादावरील या टीकेमधूनच मवाळमतवादी नेत्यांची सर्वांत महत्त्वाची भूमिका प्रकट होते. दादाभाई नौरोजी व महादेव गोविंद रानडे यांनी ब्रिटिशांच्या भारतातील आर्थिक धोरणावर घणाघाती टीका करणारे लेख व पुस्तके लिहून व भाषणे देऊन भारतीय अर्थव्यवस्थेच्या शोषणाशी असलेले ब्रिटिशांचे प्रत्यक्ष संबंध व लागेबांधे उघड केले. नौरोजींनी भारतातील संपत्ती ब्रिटिशांच्या आर्थिक धोरणामुळे कशा प्रकारे इंग्लंडमध्ये जात होती, हे दाखवणारा 'संपत्तीच्या निचऱ्याचा सिद्धांत' (drain theory) मांडला. ब्रिटिश राजवट भारतीय लोकांसाठी हिताची आहे, हे जनमानसात रूढ झालेले मिथक त्यांनी खोटे ठरविले. याशिवाय काँग्रेसच्या अनेक नेत्यांनी उद्योगधंदे, कृषी, कर, दळणवळण व जकात इत्यादी-संबंधीच्या ब्रिटिश धोरणात मूलगामी परिवर्तन करण्याची मागणी केली. इंग्लंड व भारतामध्ये असलेला शोषणाचा संबंध त्यांनी ताबडतोब नष्ट करण्याची मागणी केली.

### जहाल राष्ट्रवादाचा उदय

भारतीय राजकारणात जहालवादाचा उदय काही अचानकपणे झाला नाही. १८५७ च्या उठावानंतर 'स्वधर्म' व 'स्वराज्य' या संकल्पनांची ज्योत भारतीय जनमानसात सतत तेवत राहिली होती. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वामी दयानंद सरस्वती, विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि अरविंद घोष या नेत्यांच्या शिकवणुकीतून भारतीय संस्कृतीबद्दल जनतेत अभिमानाचे स्फुल्लिंग चेतवले गेले. इंग्रजीतून शिकलेला वर्ग लोकांपासून काहीसा बाजूला पडला होता. जहाल विचारधारेने जाज्वल्य पुरोगामित्व निर्माण करून शिक्षित वर्ग व जनता यांच्यामधील दरी कमी केली. मवाळ नेत्यांच्या कार्यामुळे जनतेच्या जाणिवा प्रगल्भ झाल्या होत्या. मात्र त्यांच्या कायद्याच्या चौकटीत राहून ब्रिटिश राज्यकर्त्यांना विनंती करण्याच्या पद्धतीला फारसे यश लाभले नव्हते. परिणामी अनेकजण वैफल्यग्रस्त झाले होते व त्यांचा भ्रमनिरास झाला होता. १९ व्या शतकाच्या शेवटी तर सर्व लोकांमध्ये सक्रिय आंदोलनाशिवाय ब्रिटिश सरकार भारतीय जनतेच्या मागण्या मान्य करणार नाही, असाच सूर उमटू लागला होता.

केंब्रिज विद्यापीठाच्या इतिहासकारांनी आपल्या मांडणीत भारतामधील जहालवादाच्या उदयाला काँग्रेस-मधील गटबाजीला जबाबदार धरले आहे. सुरुवातीच्या काळातील काँग्रेसमधील गटबाजीच्या विश्लेषणाचे महत्त्व नाकारता येणार नाही; कारण ही गटबाजी अभ्यासल्यावर आपल्याला सुरुवातीच्या राष्ट्रवादाच्या ध्येयाबद्दल काँग्रेसच्या नेतृत्वात झालेले मतभेद कळून येतात. पण गटबाजीला जरुरीपेक्षा जास्त महत्त्व देऊनदेखील चालणार नाही. जहाल आणि मवाळ नेते हे फक्त काँग्रेसला आपल्या नियंत्रणाखाली आणण्यासाठी एकमेकांशी चढाओढ करत

होते, असे समजणे योग्य होणार नाही. कारण जहाल नेत्यांना काँग्रेसवर कब्जा करण्याची घाई का झाली होती, हे समजणे अवघड आहे. काँग्रेसवर कब्जा करून त्यांना काही सत्ता मिळणार नव्हती. काँग्रेस या काळात वर्षाला भेटणारी एक साधी संघटना होती, जिच्याकडे अनेक वेळा खर्ची टाकण्यासाठी पैसेदेखील नव्हते.

देशाबाहेरील आंतरराष्ट्रीय घटनांनी जहालमतवादी-वृत्तीच्या वाढीला प्रोत्साहन दिले. आर्यलँड, रशिया, इजिप्त, तुर्कस्तान, चीन व दक्षिण आफ्रिका येथील क्रांतिकारी स्वातंत्र्य चळवळींनी एकीचे महत्त्व पटवून दिले, तर इथिओपियाने इटलीचा केलेला पराभव तसेच जपानने रशियाचा केलेला पराभव यांमुळे युरोपियन राष्ट्रे अजिंक्य असल्याचे मिथक नाहीसे झाले. या घटनां-मुळे भारतीय लोकांचा स्वाभिमान व आत्मविश्वास वाढला. बाळ गंगाधर टिळक, बिपिनचंद्र पाल, लाला लजपतराय आणि अरविंद घोष या जहालमतवादी नेत्यांनी ब्रिटिश राजवटीविरुद्ध भावना जनमानसात पेरून असंतोष निर्माण केला. बंगालच्या फाळणीनंतर जहालमतवादी विचारप्रणाली लोकप्रिय झाली व फाळणीविरुद्ध 'स्वदेशी चळवळ' या रूपात प्रकट झाली.

मवाळमतवादी नेत्यांप्रमाणे ब्रिटिशांच्या चांगुलपणावर व त्यांच्या न्यायी बुद्धीवर जहाल नेत्यांचा विश्वास नव्हता. त्यांच्या मते ब्रिटिश भारतात स्वार्थी हेतूने आले असून भारताचे आर्थिक शोषण करणे हे त्यांचे प्रमुख उद्देश होते. यामुळे भारतवासीयांच्या मागण्या ते सहज मान्य करतील असे समजणे चुकीचे ठरणार होते. म्हणूनच तर मवाळ नेत्यांच्या विनंती अर्ज प्रार्थनांनी व भिक्षांदेहीमुळे काहीही प्राप्त झाले नाही. तेव्हा ब्रिटिश सरकारविरुद्ध उघडपणे दंड थोपटून आंदोलन करणे व लोकमताचा दबाव आणून मागण्या मान्य करून घेणे हेच सूत्र योग्य होते असे ते मानीत.

जहालमत असलेल्या नेत्यांच्या कार्यक्रमात ब्रिटिश राजवटीविरुद्ध जनतेच्या मनात भावनात्मक उद्रेक निर्माण करण्याला महत्त्वाचे स्थान होते. असे करून त्यांना चळवळीमधील जनतेचा सहभाग वाढवायचा होता. जनते-मध्ये एकी साधणे, लोकांना स्वावलंबी व स्वाभिमानी बनवणे व त्यांचे प्रबोधन करून त्यांना स्वराज्य मिळवण्या-साठी लागणाऱ्या संघर्षासाठी तयार करणे ही उद्दिष्टे त्यांना गाठायची होती. अरविंद घोष व बाळ गंगाधर टिळक यांनी प्रामुख्याने या योजनेचे खालील प्रारूप तयार केले होते.

अ) परदेशी मालावर बहिष्कार म्हणजे 'स्वदेशी'चा पुरस्कार-अर्थात स्थानिक उद्योगधंदे, व्यापार यांना प्रोत्साहन.

ब) सरकार यंत्रणेशी असहकार तसेच सरकारी कार्यक्रमात असहभाग.

क) नवीन शाळा व महाविद्यालये स्थापन करून विद्यार्थ्यांमध्ये स्वाभिमान जागृत करणे, भारतीय संस्कृतीचा समृद्ध वारसा जोपासणे, राष्ट्रवादी व लोकहितवादी मानस तयार करणे व त्यांना स्वावलंबी व स्वतंत्र बाण्याचे बनविणे.

ड) ब्रिटिश सरकारला निःशस्त्र प्रतिकार (Passive resistance) करणे. ब्रिटिश सरकारला शेतसारा व कर न देणे व समांतर स्थानिक प्रशासन यंत्रणा उभारून ग्राम, तालुका व जिल्हा पातळीवरील कार्यक्रमाला हातभार लावणे.

जहालमतवादी नेत्यांनी भारतीय राष्ट्रवादाला एका वेगळ्या पातळीवर नेले. त्यांनी स्वराज्याची जोरदार मागणी केली व ब्रिटिश राजवटीला प्रतिकार करण्यासाठी एक प्रभावशाली व सकारात्मक पद्धत विकसित केली. त्यांची राष्ट्रवादाची संकल्पना भावनाप्रधान होती व भारताच्या अध्यात्मिक वारशाच्या नवीन आकलनावर आधारलेली होती. अरविंद घोष यांनी वेदांताच्या तत्त्वज्ञानाचा नवीन अर्थ लावला व मानव आणि ईश्वर यांच्या एकत्वा-मध्ये राष्ट्रवादाची संकल्पना शोधली. त्यांनी आपले राष्ट्र-वादासंबंधीचे विचार आपल्या आध्यात्मिक विचारांशी जोडले. राष्ट्रीय कार्य म्हणजे ईश्वरसेवा, असा त्यांनी उपदेश दिला. राष्ट्राला 'भारतमाता' म्हणून मान दिला. लोकमान्य टिळकांनी त्यांच्या 'गीतारहस्य' या ग्रंथाच्या माध्यमातून महाभारतातील गीतेचा प्रमुख संदेश भक्ती वा संन्यास नसून, निष्काम कर्मयोग आहे आणि राष्ट्रासाठी केलेले काम हे एक प्रकारचे निष्काम कर्मच आहे, असे मत मांडले. जहालमताच्या नेत्यांनी परकीय ब्रिटिश राज-वटीला तीव्र विरोध केला. त्यांच्या मते लोकहित साधणारे

व न्यायी प्रवृत्तीचे परकीय सरकारही 'स्वराज्याची' जागा कधीच घेऊ शकत नाही.

परकीय सत्तेच्या राजवटीविरुद्ध राजकीय चळवळी करून लोकांना जागृत करण्यावर जहाल नेत्यांचा फार भर होता. राष्ट्राच्या पातळीवर जर एखादे राजकीय आंदोलन उभे राहत नसेल, तर जनतेला त्यासाठी तयार करण्याची जबाबदारी लोकनेत्यांची आहे, असे त्यांचे मत होते. त्याकरिता त्यांनी तुरुंगवास व इतर शिक्षा भोगण्याची तयारी ठेवली होती. परकीय सत्तेविरुद्धच्या लढ्याकडे ते पूर्णवेळ कार्य म्हणून पाहत असत. जहाल-मतवाद्यांनी काढलेल्या मिरवणुका व मोर्चे यांमुळे ब्रिटिशां-विरुद्धच्या लढ्यात सामान्य भारतीय जनता ओढली गेली होती. जहाल नेत्यांनी 'शिवाजी'सारख्या लोकप्रिय प्रतिमेचा व 'गणपती आणि काली'सारख्या धार्मिक प्रतिमांचा जनजागृतीसाठी उपयोग केला. अशा प्रकारे जहालमतवादी नेतृत्वाखाली काँग्रेस हे जनसामान्यांचे आंदोलन बनले. परंतु जहालमतवादी नेतृत्वाला त्यांनी निर्माण केलेल्या जनतेच्या प्रक्षोभाचा पूर्णतः फायदा उठवता आला नाही व बहिष्कार व निःशस्त्र प्रतिकार यांचा परिणामकारक उपयोग करता आला नाही; कारण त्यांस ब्रिटिश दडप-शाहीस तोंड द्यावे लागले. शहरातील मध्यमवर्ग व गरीब लोकांमध्ये जागृती करण्यात त्यांना यश मिळाले; परंतु शेतकरी-कामगारवर्गाला जागृत करण्याचे काम मात्र अपूर्णच राहिले होते.

एक महत्त्वाचा मुद्दा येथे नमूद करावासा वाटतो, की जहाल नेत्यांनी जरी जनजागृती करण्यासाठी धार्मिक प्रतिमांचा त्यांच्या कार्यक्रमात उपयोग केला असला, तरी त्यांची राष्ट्रत्वाची संकल्पना सर्वधर्मसमावेशक होती.

आरंभीच्या काळातील काँग्रेसची अधिवेशने शिस्तबद्ध पद्धतीने व शांततेच्या वातावरणात झाली. प्रत्येक अधि-वेशनात काँग्रेसचे नेते ब्रिटिश उदारमतवादावर असलेल्या त्यांच्या विश्वासाचा आवर्जून उल्लेख करत असत. त्यांनी वारंवार आपल्या ब्रिटिश राजनिष्ठेची घोषणादेखील केलेली आढळते. काँग्रेस नेत्यांची पहिल्या अधिवेशनापासून मागणी होती, की ब्रिटिशांनी राज्यकारभारामध्ये हिंदुस्थानी लोकांचा सहभाग वाढवला पाहिजे. अशा धोरणाचा फायदा ब्रिटिश राजवटीला आणि त्याबरोबर हिंदुस्थानातील लोकांनादेखील झाला असता. काँग्रेसचे नेते राज्यकारभारामध्ये सहभागाची मागणी स्वतःच्या वर्गाचे हितसंबंध जपण्यासाठी करत नव्हते. ते सर्व हिंदुस्थानी लोकांचे हित जपण्याचा विचार करत होते.

काँग्रेसने १८९० साली चार्लस ब्रॅदलॉ (१८३३-१८९१) यांच्या मदतीने ब्रिटनच्या संसदेत हिंदुस्थानासाठी उदारमतवादी राजकीय सुधारणा मंजूर करून घेण्याचा प्रयत्न केला होता. १८९२ च्या कायद्याने केलेल्या सुधारणा-देखील पोकळ ठरल्या. काँग्रेसमधील काही तरुण नेत्यांचा ब्रिटिश न्यायावरचा विश्वास उडू लागला होता. काँग्रेसने केलेल्या इतर मागण्यांची ब्रिटिशांनी दखलदेखील घेतली नव्हती. ह्यामुळे अशी भावना निर्माण झाली, की ब्रिटन आपण दिलेल्या आश्वासनानुसार राज्यकारभारात हिंदुस्थानी लोकांना भरीव वाटा देण्यास तयार नाही. लॉर्ड एल्गिनच्या कारकिर्दीत ब्रिटिश नोकरशाहीने काँग्रेसला तिरस्काराची वागणूक देणे सुरू केले. लॉर्ड एल्गिननंतर आलेल्या लॉर्ड कर्झनच्या काळात तर काँग्रेस व ब्रिटिश राज्यकर्त्यांचे संबंध खूपच बिघडले. लॉर्ड कर्झनच्या प्रतिगामी धोरणांमुळे काँग्रेसमधील असंतोष बळावला. कलकत्ता कॉर्पोरेशन कायदा, हिंदुस्थानातील विद्यापीठांसाठीचा कायदा आणि बंगालची फाळणी या लॉर्ड कर्झनने घेतलेल्या निर्णयांमुळे काँग्रेसमधील अनेकांचा काँग्रेसने तोपर्यंत अवलंबलेल्या 'विनंती धोरणावर'चा (Mendicant policy) विश्वास हरपला. काँग्रेसमधील ह्या वाढत्या असंतोषाचा परिणाम म्हणजे भारतात प्रथमच मोठ्या प्रमाणात राजकीय चळवळी सुरू झाल्या.

### स्वदेशी चळवळ

नेहमीच्या मवाळ पद्धतीने बंगालच्या फाळणीविरुद्ध आंदोलन सुरू झाले होते; पण जरा चढ्या आवाजाने व क्रुद्ध स्वरातील निषेधाने ! फाळणीच्या योजनेविरुद्ध वर्त-मानपत्रांतून टीकेची झोड उठवली गेली, सभा आयोजित केल्या गेल्या आणि फाळणी रद्द होण्यासाठी ब्रिटिश सरकारकडे द्यावयाच्या अर्जांचे मसुदे तयार करण्यात आले. कलकत्त्याच्या टाउन हॉलमध्ये मोठी सभा घेऊन बंगाल प्रांताच्या कानाकोपऱ्यांतून आलेल्या नागरिकांना त्यांच्या दुःखावलेल्या भावना व्यक्त करण्याची संधी देण्यात आली. तरीही ब्रिटिश सरकारची बेपर्वाई कमी होत

नव्हती. चळवळीच्या वरील पद्धतीचे अपयश उघड झाले होते. आणि म्हणून नव्या तंत्राची आणि मंत्राची गरज जाणवत असतानाच १९०५ मध्ये ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याच्या परिणामकारक शस्त्राचा शोध लागला. कृष्णकुमार मित्र यांनी ३ जुलै १९०५ च्या *संजीवनी*मध्ये बहिष्काराची सूचना केली व ती ७ ऑगस्टच्या टाउन हॉलमधील सभेत प्रमुख नेत्यांनी मान्य केली. लगेचच रवींद्रनाथ टागोर यांनी एकमेकांच्या हातावर राखी बांधून बंधुभाव वाढविण्यासाठी रक्षाबंधनाचा सण साजरा करण्याची सूचना केली, तर रामेंद्र सुंदर त्रिवेदी यांनी फाळणीदिवस 'आरांधन' म्हणून दुखवटा पाळावा असे सुचवले. या अशा कार्यक्रमांनी बंगालच्या फाळणी-विरुद्धच्या आंदोलनाला भावनात्मक स्वरूप लाभले.

ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून झाल्यानंतर स्वदेशी मालाचा प्रचार करणे सुरू करण्यात आले व चरख्याद्वारे सूतकताई हाती घेण्यात आली. स्वदेशी मेळा किंवा यात्रा आयोजित करून हस्तकलाउद्योगाला प्रोत्साहन देण्यात आले. स्वदेशी चळवळीमुळे बंगालमध्ये खूप उल्हासपूर्ण वातावरण निर्माण झाले व कलकत्ता पॉटरीज्, बेंगाल केमिकल्स, बंगेलक्ष्मी कॉटन मिल्स, मोहिनी मिल्स व नॅशनल टॅनरीसारखे पूर्णतः भारतीय उद्योगधंदे सुरू झाले. तसेच या प्रेरणादायी परिस्थितीमध्ये निरनिराळे साबण, काडेपेटी व तंबाखू तयार करणारे धंदे सुरू झाले. तेलबियांपासून तेल काढणाऱ्या मिल्स, आर्थिक व्यवहार करणाऱ्या स्वदेशी बँका, विमा कंपन्या व स्टीम नेव्हिगेशन कंपन्या स्थापन करण्यात आल्या.

विद्यार्थ्यांनी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार टाकला. ब्रिटिश सरकारने विद्यार्थीआंदोलकांवर अनेक निर्बंध घातले. शाळांचे अनुदान बंद केले व विद्यार्थ्यांच्या शिष्य-वृत्त्या व प्रवेश रद्द करण्याच्या धमक्या दिल्या (२२ ऑक्टोबर १९०५ चे कुप्रसिद्ध कार्लाइल सर्क्युलर). शिक्षणसंस्थांवर बहिष्कार टाकलेल्या विद्यार्थ्यांचे शिक्षण खोळंबून राहू नये म्हणून स्वदेशी चळवळीच्या नेत्यांनी बंगालमध्ये समांतर स्वदेशी शिक्षणव्यवस्था निर्माण केली. याच प्रयत्नातून बंगाल टेक्निकल इन्स्टिट्यूट साकारली (२५ जुलै १९०६ तिची मध्ये स्थापना झाली व जी नंतर 'कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग अँड टेक्नॉलॉजी, जाधवपूर' म्हणून नावारूपाला आली.) नॅशनल कॉलेज अँड स्कूलची १५ ऑगस्ट १९०६ ला स्थापना झाल्यावर अरविंद घोष यांनी त्याचे प्राचार्यपद स्वीकारले.

**काँग्रेसमधील दुफळी**

काँग्रेसमधील या दोन गटांचे अस्तित्व १९०५ सालच्या बनारस येथे झालेल्या अधिवेशनात पहिल्यांदाच जाणवले. बनारस अधिवेशनाच्या कार्यक्रमपत्रिकेमध्ये जहाल गटाच्या नेत्यांना जवळ असलेल्या स्वदेशी चळवळ, बहिष्कारयोग, राष्ट्रीय शिक्षणासारख्या विषयांचा अंतर्भाव केलेला नव्हता. टिळक, लजपतराय, बिपीनचंद्र पाल यांचे असे म्हणणे होते, की काँग्रेसने बहिष्कारासंबंधी ठराव मंजूर करावा. ब्रिटिशांकडे हक्कांसाठी विनंती करून भीक मागण्यापेक्षा बहिष्कारयोगासारखे तीव्र हत्यार उपसण्याची वेळ आलेली होती, असे जहाल गटाचे म्हणणे होते. या अधिवेशनात काही जहाल प्रतिनिधी मवाळांच्या ब्रिटिश राज्यकर्त्यांकडे विनंती करण्याच्या धोरणाचा निषेध करत अधिवेशनाच्या मांडवातून उठून बाहेर आले. काँग्रेस जहाल-मवाळ गटांमध्ये दुभंगण्याची शक्यता निर्माण झाली.

१९०६ साली कलकत्ता अधिवेशनात पुन्हा मवाळ व जहाल गट एकमेकांसमोर अधिवेशनाच्या अध्यक्ष-निवडीच्या प्रश्नावरून संघर्षाच्या भूमिकेत आले. पण दादाभाई नौरोजी यांनी या अधिवेशनाचे अध्यक्षपद स्वीकारल्यामुळे जहाल-मवाळ गटांमधील खुला संघर्ष टळला. दादाभाईंच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी स्वराज्याची मागणी केली आणि ते मिळवणे हे काँग्रेसचे कर्तव्य असल्याचे सांगितले. कलकत्त्याचे अधिवेशन काँग्रेसचे २२ वे अधिवेशन असल्यामुळे काँग्रेस आता वयात आली, असे दादाभाईंनी घोषित केले. पन्नास वर्षांहून अधिक काळ विलायतेत गाऱ्हाणी मांडून तेथील लोकांची मने वळविण्याचा आपण प्रयत्न केला, पण तो यशस्वी झाला नाही; त्यामुळे आपण निराश झाल्याचे सांगून दादाभाई म्हणाले, "आपल्या जागी दुसरा कोणी पुरुष असता, तर तो बंड करण्यास खचित प्रवृत्त झाला असता." कलकत्ता अधिवेशनात चार महत्त्वाचे ठराव मंजूर करण्यात आले. स्वराज्याच्या मागणीप्रमाणेच स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण यांबद्दलचे ठराव केले गेले. या ठरावांमुळे काँग्रेसच्या धोरणात मूलभूत

अनुक्रमणिका

परिवर्तन घडून आले व काँग्रेसला नवी दिशा मिळाली, असे टिळकांसारख्या जहाल नेत्यांना वाटले.

जरी बनारस अधिवेशनात जहाल व मवाळ गटांमध्ये दादाभाईंच्या मध्यस्थीने तडजोड होऊन खुला संघर्ष टळला असला, तरी जहाल गटाच्या नेत्यांचे समाधान झाले नव्हते. त्यांनी १९०७ चे पूर्ण वर्ष काँग्रेसच्या मवाळ धोरणाविरुद्ध सर्व देशभर प्रचार केला. ब्रिटिश राजवटीला सहकार्य करणे कशा प्रकारे निरर्थक आहे, हे भाषणे देऊन व वृत्तपत्रांमध्ये लेख लिहून लोकांना समजावून सांगण्याचा प्रयत्न केला.

काँग्रेसचे पुढील अधिवेशन नागपूर शहरामध्ये आयोजित करण्यात येणार होते; पण काही स्थानिक पातळीवरील वाद निर्माण झाल्यामुळे काँग्रेस कमिटीने अधिवेशनाचे स्थळ बदलून सुरत येथे नेले. सुरत येथे होणाऱ्या अधिवेशनात मागील अधिवेशनात मंजूर झालेले चार महत्त्वाचे ठराव वगळले जाणार आहेत, अशा अफवा नोव्हेंबर महिन्यात सर्वत्र पसरल्या होत्या. ह्या अफवा २५ डिसेंबरला अधिवेशन सुरू होण्याच्या दिवशीसुद्धा अस्तित्वात होत्या. टिळकांच्या नेतृत्वाखाली असलेला जहाल गट उत्तेजित झालेला होता व मवाळ गटाबरोबर शक्ती अजमावण्याच्या पवित्र्यात होता. हे खरे होते, की काही ज्येष्ठ मवाळ नेत्यांना असे वाटत होते, की बनारस अधिवेशनातील चार ठरावांमुळे काँग्रेसच्या ध्येय व धोरणात परिवर्तन झाले आहे आणि संधी मिळताच त्यांना ती पुन्हा बदलून जुन्याप्रमाणे करायची होती. सर फिरोजशहा मेहता यांच्या नेतृत्वाखाली असलेल्या मुंबई प्रांतामधील मवाळ गटाने सुरत येथे एप्रिलमध्ये आयोजित केलेल्या काँग्रेसच्या मुंबई प्रांतीय सभेच्या कार्यक्रमातून बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण हे दोन विषय वगळण्यात यश मिळवले होते. साहजिकच जहाल नेत्यांना संशय आला, की सुरत अधिवेशनातदेखील मवाळ गट अशीच खेळी करण्याचा प्रयत्न करणार.

काँग्रेसच्या स्वागतसमितीमध्ये सर फिरोजशहा मेहता यांच्या अनुयायांचा भरणा होता. ज्येष्ठ मवाळ नेते गोपाळ कृष्ण गोखले यांना अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून दुसरे ज्येष्ठ मवाळवादी नेते डॉ. रासबिहारी घोष यांचे नाव सुचवण्यात व मान्य करून घेण्यात कोणतीही अडचण आली नाही. पण असे करण्यासाठी त्यांना ज्येष्ठ जहालमतवादी नेते लाला लजपतराय यांच्या नावाचा प्रस्ताव नाकारावा लागला. 'एका जहालवादी नेत्याला ह्या अधिवेशनाचे अध्यक्ष करून आपण आजच्या घडीला ब्रिटिश सरकारचा रोष पत्करला, तर ते आपल्या चळवळीची गळचेपी करतील' असे सांगून लाला लजपतराय यांचे नाव बाजूला करण्यात आले. या गोष्टीमुळे जहाल गट अपमानित झाला. मवाळ गट अधिवेशनाचा अध्यक्ष म्हणून आपला नेता नेमण्यात यशस्वी झाला होता. जहाल गटाने मात्र सुरत अधिवेशनात संपूर्ण शक्तीने हजर राहून मवाळ नेत्यांना विरोध करण्याचे ठाणले.

सुरत अधिवेशन सुरू होताच जहाल गटाने मुख्य काँग्रेसछावणीत न राहता आपली वेगळी छावणी स्थापन केली. असे काँग्रेसच्या इतिहासात पहिल्यांदाच झाले होते. बाळ गंगाधर टिळक, दादासाहेब खापर्डे, अरविंद घोष यांच्यासारख्या जहाल नेत्यांनी ह्या वेगळ्या छावणीत आपल्या अनुयायांना संघटित केले होते. मवाळवादी नेत्यांच्या कोणत्याही धोरणात्मक निर्णयाला विरोध करण्याची शपथ देण्यात आली. अधिवेशनाला हजर असलेल्या प्रतिनिधींमध्ये जहाल गटाचे अनुयायी ५०० पेक्षा जास्त होते व मवाळ अनुयायी साधारणपणे १२००च्या संख्येने उपस्थित होते. मवाळ गटाची संख्या जहाल गटाच्या तुलनेने दुपटीपेक्षाही जास्त होती.

मवाळ नेत्यांनी अधिवेशनात मंजूर करण्याच्या ठरावांचा कच्चा मसुदा जहाल नेत्यांपासून गुप्त ठेवला. मुंबईच्या एका वर्तमानपत्रात हा मसुदा २६ डिसेंबरला छापून आला होता, तरी जहाल नेत्यांना ह्या मसुद्याची प्रत दिली गेली नव्हती. कच्च्या मसुद्यात असे शब्द मवाळांनी वापरले होते, की त्यामुळे कलकत्ता अधिवेशनात संमत झालेल्या ठरावांमध्ये परिवर्तन होणार होते. कलकत्त्यात संमत झालेले स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण हे ठराव मवाळ नेत्यांना नाकारायचे होते, अशीच गोष्ट ह्या कच्च्या मसुद्यावरून व्यक्त होत होती. जहाल नेतृत्वाचा आणखी एका गोष्टीला विरोध होता. गोपाळ कृष्ण गोखल्यांनी काँग्रेससाठी एक संविधान तयार केले होते. या नवीन संविधानात मवाळ गटाच्या विचारांशी मिळतेजुळते न घेणाऱ्यांना काँग्रेस संघटनेतून

बेदखल करण्याची योजना केली होती. ह्या संविधानात काँग्रेसचे ध्येय पुढीलप्रमाणे स्पष्ट केले होते– "भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचे अंतिम ध्येय म्हणजे ब्रिटिश साम्राज्यातील इतर सदस्यराष्ट्रांप्रमाणे स्वशासन मिळवणे हे होते." बाळ गंगाधर टिळक यांनी ह्या नियोजित संविधानावर कलकत्ता अधिवेशनात मंजूर झालेले स्वराज्याचे ध्येय बदलण्याचा आरोप केला. टिळकांनी असे म्हणणे मांडले, की काँग्रेसच्या सदस्यत्वासाठी ह्या नवीन ध्येयाची स्वीकृती अनिवार्य करून मवाळ नेत्यांनी जहाल वृत्तीच्या प्रतिनिधींना काँग्रेसमधून बाहेर काढण्याचा कट रचला आहे.

२४ डिसेंबर १९०७ रोजी जहाल गटाच्या सर्व प्रतिनिधींतर्फे अरविंद घोष यांच्या अध्यक्षतेखाली एक सभा घेण्यात आली. या सभेत मवाळांनी चालवलेली काँग्रेसची अवनती रोखण्याचा निर्णय घेण्यात आला. सर्व सांविधानिक मार्ग अवलंबून, वेळ पडलीच तर अध्यक्षांच्या निवडीला विरोध करून, हे करण्याचे जहाल गटाने ठरविले. २६ डिसेंबरला सकाळी टिळक, खापर्डे आणि अरविंद घोष यांनी मवाळ नेत्यांकडून परिस्थिती 'जैसे थे' ठेवण्याचे आश्वासन मिळवण्याचा प्रयत्न केला. सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांनी उडवाउडवीचे उत्तर दिले, तर स्वागत समितीचे अध्यक्ष गोविंद मालवी जहालांच्या शिष्टमंडळाला भेटलेसुद्धा नाहीत. हे स्पष्ट झाले, की मवाळ गटाला कोणत्याही प्रकारची तडजोड करायची नव्हती; कारण त्यांना त्यांच्या बहुमतावर पूर्ण विश्वास होता. जहाल-मवाळ गटांमध्ये खुला संघर्ष अटळ होता, हे स्पष्ट झाले होते.

दुसऱ्या दिवशी सुरतमधील ऐतिहासिक फ्रेंच गार्डनमध्ये अधिवेशन सुरू झाले. मांडवामध्ये जवळजवळ ७००० लोक जमले होते. अधिवेशनाचे होणारे अध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष मांडवात आल्यावर खळबळ उडाली. अनेकांनी त्यांचे स्वागत करणाऱ्या घोषणा दिल्या, तर अनेकांनी ओरडून त्यांचा निषेधदेखील केला. स्वागत समितीचे अध्यक्ष मालवी यांचे भाषण सुरू असताना जहाल गटाच्या प्रतिनिधींनी आरडाओरड करून व्यत्यय आणला. जेव्हा दिवाणबहादूर अंबालाल यांनी डॉ. घोष यांचे नाव अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून सुचवले, तेव्हा 'नाही नाही'च्या घोषणा केल्या जाऊ लागल्या. सुरेंद्रनाथ बॅनर्जी डॉ. घोष यांच्या नावाला दुजोरा देण्यासाठी उठल्यावर तर 'नाही नाही'च्या घोषणा आणखीनच वाढल्या. मांडवामध्ये एवढी घोषणाबाजी चालली होती, की सुरेंद्रनाथ बॅनर्जींचे भाषण ऐकूदेखील येत नव्हते. मांडवातील गोंधळ वाढल्यावर अधिवेशन त्या दिवसासाठी स्थगित करण्यात आले. आश्चर्य याचे वाटते, की अधिवेशन स्थगित झाल्यानंतर तडजोडीचे कोणतेही प्रयत्न झाले नाहीत. दुसऱ्या दिवशी टिळकांनी तडजोड करण्याचा प्रयत्न केला, पण तोदेखील निष्फळ ठरला.

२७ तारखेला दुपारी अधिवेशन पुन्हा सुरू झाले. मालवी सभेत येत असताना त्यांच्या हातात कोणीतरी टिळकांनी लिहिलेली चिठ्ठी दिली. अधिवेशनाच्या अध्यक्षाच्या निवडीला दुजोरा देणारे भाषण झाल्यावर काँग्रेसच्या प्रतिनिधींशी आपल्याला बोलायचे आहे व स्थगनप्रस्ताव मांडायचा आहे, असे या चिठ्ठीत टिळकांनी लिहिले होते. मात्र मालवी यांनी ही चिठ्ठी आपल्या खिशात घातली व टिळकांना कोणतेही उत्तर दिले नाही. खरेतर टिळकांच्या स्थगनप्रस्तावाची नोंद न घेणे हे असभ्य तर होतेच, पण असंविधानिकदेखील होते. मालवी यांना टिळकांचा स्थगनप्रस्ताव काँग्रेसच्या प्रतिनिधींपुढे ठेवता आला असता व बहुमताने फेटाळतासुद्धा आला असता किंवा त्यांना तो सार्वजनिकरीत्या नाकारतादेखील आला असता. मात्र टिळकांच्या स्थगनप्रस्तावाकडे दुर्लक्ष करणे हे सांविधानिक वर्तन नव्हते. सुरेंद्रनाथ बॅनर्जींनी आपले अर्धे राहिलेले भाषण संपल्यावर मोतीलाल नेहरूंनी रासबिहारी घोष यांच्या निवडीला अनुमोदन देणारे भाषण केले. त्यानंतर टिळक मंचावर जाण्यासाठी उठले. त्यांना मंचावर जाण्यापासून रोखण्यासाठी एका स्वयंसेवकाने पकडले; पण त्याला झटकून टिळक मंचावर पोचले व प्रतिनिधींशी बोलणे व स्थगनप्रस्ताव मांडणे आपला हक्क आहे, असे वारंवार म्हणू लागले. टिळकांच्या ह्या म्हणण्याला मालवी आणि रासबिहारी घोष ओरडून विरोध करत होते. ही गोष्ट घडेपर्यंत मांडवात गोंधळ माजला होता. टिळकांना मंचावरून खाली खेचण्याचादेखील प्रयत्न झाला. हेन्री नेवीनसन हा इंग्रजी पाहुणा सुरत येथील काँग्रेसच्या अधिवेशनात हजर होता. त्याने जहाल-मवाळ संघर्षाचा वृत्तान्त खालीलप्रमाणे दिला आहे : "अचानक

अनुक्रमणिका

एक टोकदार लाल चमडीची खीळ असलेली मराठी चप्पल हवेत उडाली. ती सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांच्या गालाला लागली व फिरोजशहा मेहता यांच्यावर जाऊन पडली. फेटेवाले अनेक लोक लांब काठ्या घेऊन मंचाच्या जवळ आले व मवाळ वाटणाऱ्या व्यक्तींच्या डोक्यात काठ्या मारू लागले." अधिवेशनाच्या मंचावरील खुर्च्या उचलून एकमेकांना मारण्याचा प्रयत्न झाला. पण सुदैवाने कुणाला फार मोठी दुखापत झाली नाही. काही वेळाने पोलिस आले व त्यांनी काही लोकांना अटक केली व मांडवामधील गर्दी पांगवली. २७ डिसेंबरला घडलेल्या बखेड्यामुळे काँग्रेसचे अधिवेशन बेमुदत तहकूब करण्यात आले.

**काँग्रेसची घटना (१९०८),**
**मोर्ले-मिंटो सुधारणा (१९०९)**

सुरत अधिवेशन संपल्यावर लगेचच २८ डिसेंबरला मवाळांनी काँग्रेसच्या मंडपात एक राष्ट्रीय कन्व्हेन्शन आयोजित केले व काँग्रेससाठी नवीन घटना तयार करण्यासाठी एक समिती नेमली. ह्याच समितीच्या शिफारशींवर आधारलेली घटना १८ एप्रिल व १९ एप्रिल १९०८ रोजी अलाहाबादच्या बैठकीत मंजूर करण्यात आली. अलाहाबादच्या बैठकीत काँग्रेसची उद्दिष्टे व ती साध्य करण्याकरिता अवलंबण्यात येणारे मार्ग निश्चित करण्यात आले. हे ठरवणारे घटनेचे पहिले कलम नंतरच्या काळात 'काँग्रेस क्रिड' म्हणून ओळखले गेले. अर्थातच पहिल्या कलमावर मवाळ विचारसरणीचा प्रभाव होता. ब्रिटिश साम्राज्यांतर्गत वसाहतीसारखे स्वराज्य व त्यासारखा दर्जा मिळवणे, हे काँग्रेसचे राजकीय ध्येय स्पष्ट करण्यात आले. ब्रिटिश राजवटीवर निष्ठा दाखवण्यात आली व काँग्रेसचे ध्येय राष्ट्रीय ऐक्यभावना वाढवून सनदशीर मार्गांनी हळूहळू सुधारणा करूनच साधायचे, असे ठरवण्यात आले. याशिवाय काँग्रेसच्या अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या सभासदांची संख्या प्रांतानुसार ठरवण्यात आली. या प्रतिनिधींशिवाय काँग्रेसचे सर्व माजी अध्यक्ष आणि सरचिटणीस हे ह्या अखिल भारतीय काँग्रेस समितीचे सदस्य होते. प्रांतीय काँग्रेस समित्या, जिल्हा व तालुका काँग्रेस समित्या, प्रांतीय काँग्रेसने मान्यता दिलेल्या राजकीय संघटना व सार्वजनिक संस्था यांच्या माध्यमातून कार्य करण्याची योजना करण्यात आली.

अलाहाबाद येथे केलेल्या काँग्रेसच्या नवीन घटनेत ठरविल्याप्रमाणे ध्येय व कार्यपद्धती स्वीकारणे काँग्रेसचे सदस्यत्व मिळवण्यासाठी अनिवार्य करण्यात आले. ब्रिटिश राजवटीवर निष्ठा असण्याची सभासदत्वाची अट जहाल नेत्यांनी स्वीकारणे शक्य नव्हते. त्यामुळे मवाळांच्या प्रभावाखाली तयार केलेल्या काँग्रेसच्या ह्या घटनेने जहाल वृत्तीच्या प्रतिनिधींना काँग्रेससंघटनेतून बाहेर ठेवले. १९०८ च्या डिसेंबर महिन्यात जहाल नेत्यांनी आपली स्वतंत्र काँग्रेस नागपूर येथे घेण्याचा प्रयत्न केला होता; पण ब्रिटिश सरकारने त्यांना परवानगी नाकारली होती.

सुरत अधिवेशनात मवाळमतवादी आणि जहालमतवादी नेत्यांमधील संघर्षासाठी जबाबदारी ठरवणे वादग्रस्त आहे. हे खरे आहे, की जहालमतवादी नेत्यांचे अनुयायी लाठ्या घेऊन अधिवेशनाला आले होते. पण जरा एका व्यापक दृष्टिकोणातून ह्या घटनेकडे पाहिले, तर असे दिसते की जहालमतवादी नेत्यांना डिवचण्याची चूक ही मवाळमतवाद्यांनीच केली होती. सुरत अधिवेशनानंतरच्या काही महिन्यांत लाला लजपतराय, लोकमान्य टिळक आणि बंगाल प्रांतातील अनेक जहालमतवादी नेत्यांनी काँग्रेसमध्ये समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला होता. पण मुंबई येथील मवाळमतवादी नेत्यांनी या बाबतीत ताठर भूमिका घेतली व अलाहाबाद येथील अधिवेशनात काँग्रेसमधील दुफळीला अंतिम स्वरूप दिले. सुरत अधिवेशनात मवाळांचा विजय १९१५ पर्यंत काँग्रेसवर वर्चस्व ठेवण्यास मदत करणारा ठरला. काँग्रेसच्या अधिवेशनांमध्ये जहालमतवादी नेत्यांना सहभागी न होऊ देण्यासाठी त्यांनी जाणूनबुजून प्रयत्न केले. मवाळमतवादी नेत्यांच्या या ताठर भूमिकेमागे अनेक कारणे होती; पण सर्वांत महत्त्वाचे कारण होते, की त्यांना ब्रिटिश सरकारकडून सवलती व सुधारणा येण्याची अपेक्षा होती. इंग्लंडमध्ये लिबरल पार्टीचे सरकार सत्तेत होते व प्रसिद्ध उदारमतवादी राजकीय विचारवंत जॉन मोर्ले हा भारत सचिव (Secretary of State) होता. मवाळमतवादी नेत्यांच्या मागण्यांची थोडीफार पूर्तता केली, तर ते खूश होतील व त्यांच्या बाजूने होतील, असे ब्रिटिश सरकारला वाटत होते व म्हणूनच त्यांनी 'इंडियन कौन्सिल्स ॲक्ट

१९०९' मंजूर केला. या कायद्याला 'मोर्ले-मिंटो सुधारणा' असेही म्हटले जाते. ब्रिटिशांनी ह्या कायद्याच्या माध्यमातून आपल्या 'फोडा आणि झोडा' नीतीचा हुकमी एक्का बाहेर काढला. त्यांनी काँग्रेसमधील मवाळमतवादी नेत्यांना आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न करून जहालमतवादी नेत्यांना अलग पाडले व त्यांची स्वदेशी चळवळ निर्दयपणे दडपण्याचा प्रयोग सुरू केला. या काळात ब्रिटिशांनी भारतातील राजकीय असंतोषाला तोंड देण्यासाठी विकसित केलेली धोरणे ही त्यांच्या राजवटीच्या पुढील काळातदेखील त्यांच्या उपयोगी पडली.

१९०९ च्या सुधारणा कायद्यातील सर्वांत अनिष्ट व गंभीर बाब म्हणजे मुसलमानांना धर्माच्या आधारावर वेगळा मतदारसंघ देण्यात आला, ही होय. मुस्लिम प्रतिनिधींची निवड फक्त मुस्लिम मतदारच करतील, अशी तरतूद या कायद्यात करण्यात आली. थोडक्यात, मुस्लिम जमात ही हिंदुस्थानातील सर्वस्वी वेगळी जमात आहे, हे मान्य करण्यात आले. ३० डिसेंबर १९०६ रोजी डाक्का येथे मुस्लिम नेत्यांनी मुस्लिम लीग ही राजकीय संघटना स्थापन केली. मुस्लिम लीगची स्थापना मुख्यत्वे काँग्रेसचे वाढत चाललेले महत्त्व कमी करणे यासाठी होती. काँग्रेसच्या १९०६ च्या कलकत्ता अधिवेशनात संमत झालेले ठराव – विशेषतः बंगालच्या फाळणीचा निषेध, स्वयंशासनाची मागणी व स्वदेशी चळवळीस पाठिंबा – मुस्लिम लीगने घेतलेल्या भूमिकेशी पूर्णतः विरोधी होते. फाळणीला पाठिंबा, स्वदेशी चळवळीचा निषेध आणि ब्रिटिश सरकारशी एकनिष्ठता या लीगच्या भूमिकेमुळे राष्ट्रीय काँग्रेस व मुस्लिम लीग यांच्यातील राजकीय मतभेद याच वेळी स्पष्ट झाले. १९०७-१९०८ मध्ये मुस्लिम लीगने मुस्लिमांना स्वतंत्र मतदारसंघ व त्यांचे राजकीय हितसंबंध सुरक्षित ठेवण्याचे कसून प्रयत्न केले. १९०८ मध्ये मुस्लिम लीगच्या लाहोर अधिवेशनात मुस्लिमांसाठी स्वतंत्र मतदारसंघाची मागणी करण्यात आली व त्यांची ही मागणी १९०९ च्या मोर्ले-मिंटो सुधारणा कायद्यान्वये ब्रिटिश सरकारने मान्य केली. १९०९ च्या काँग्रेसच्या लाहोर अधिवेशनात धर्माच्या आधारावर दिलेल्या वेगळ्या मतदारसंघावर कडक टीका करण्यात आली. काँग्रेसची स्वयंशासनाची (Self rule) मागणीही धुडकावून लावण्यात आली. 'स्वयंशासन' न देण्याचे कारण सांगताना मोर्ले यांनी स्पष्टपणे सांगितले, की अद्याप अशा व्यवस्थेस हिंदुस्थान योग्य नाही.

**उपसंहार**

१९०९ सालच्या मोर्ले-मिंटो सुधारणांना मवाळमतवादी नेत्यांच्या राजकारणाचे यश तसेच अपयश असे म्हणता येईल. निवडणुकीचे तत्त्व स्वीकारले; परंतु अप्रत्यक्ष निवडणुकीची गुंतागुंत लक्षात घेता, यातून खऱ्या लोकप्रतिनिधींची निवड होणे शक्य नव्हते. कायदेमंडळात चर्चा, उपप्रश्न करण्याचा अधिकार दिला; परंतु त्यांची दखल न घेण्याची तरतूद करण्यात आली. हिंदी सभासदांची संख्या वाढविली; परंतु बहुसंख्य हिंदी सभासद सरकारला कायम पाठिंबा देऊ शकतील, अशा सरकारनियुक्तांचाच त्यात भरणा होता. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे मवाळमतवादी नेते त्यात जे मुसलमानांसाठी वेगळे मतदारसंघ केले गेले, ते रोखू शकले नाहीत. मवाळमतवादी नेत्यांनी जहालमतवादी नेत्यांना काँग्रेसमधून काढून टाकल्यामुळे काँग्रेस संघटना कमकुवत झाली. जहालमतवादी नेतेच काँग्रेसची खरी शक्ती होते. त्यांनीच स्वदेशी चळवळीच्या वेळेस दाखवून दिले होते, की काँग्रेसच्या मागण्या मान्य करून घेण्यासाठी राजकीय शक्ती वापरणे जरुरीचे होते. जहालमतवादी नेत्यांनी आपला हेतू साध्य करण्यासाठी सर्वस्वी त्याग करण्याची व दुःख भोगण्याची तयारी दाखवली होती. अशा एका कृतिशील नेत्यांचा गट काँग्रेसमधून गेल्यामुळे काँग्रेसचा ब्रिटिश सरकारवरील प्रभाव घटला व ब्रिटिशांनी त्यांची गांभीर्याने दखल घेणे सोडून दिले. जर जहालमतवादी नेते काँग्रेसमध्येच राहिले असते, तर काँग्रेस बळकट राहिली असती आणि कदाचित मोर्ले-मिंटो सुधारणांत मुस्लिमांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यापेक्षा 'मतदारसंघाचे आरक्षण' या मुद्द्यावर ब्रिटिश सरकार-बरोबर तडजोड होऊ शकली असती.

१९०८ पासून स्वदेशी चळवळीचा जोर ओसरू लागला होता. सरकारने ही चळवळ कठोरपणे दडपून टाकली. लोकमान्य टिळक व लजपतराय यांना अटक करण्यात आली. अरविंद घोष व बिपीनचंद्र पाल हे प्रभावी नेते कृतिशील राजकारणापासून दूर झाले. ब्रिटिश सरकारने एका बाजूला १९०९ च्या मोर्ले-मिंटो सुधारणा

करून मवाळमतवादी नेत्यांना आपल्या बाजूने करण्याचा प्रयत्न केला व दुसरीकडे जहालमतवादी नेत्यांना दडपून त्यांना सक्रिय राजकारणातून दूर केले. जर ब्रिटिश सरकारचा हा हस्तक्षेप झाला नसता, तर कदाचित जहाल-मतवादी नेत्यांनी १९१६ पूर्वीच काँग्रेसचा ताबा घेतला असता व याआधीच काँग्रेसमध्ये एकी निर्माण झाली असती.

काँग्रेसच्या प्रारंभीच्या काळातील मवाळमतवादी नेतृत्वामध्ये गोपाळ कृष्ण गोखले यांचे योगदान महत्त्वाचे होते. १८८८ साली ते मुंबई प्रांतीय काँग्रेसचे सचिव झाले व त्यांनी १८८९ ते १८९६ या वर्षांमध्ये झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनांत सक्रिय सहभाग घेतला. १८९५ साली पुण्यात काँग्रेस अधिवेशन भरवण्यात त्यांची मोलाची कामगिरी होती. काँग्रेसच्या अधिवेशनांमध्ये गोखलेंनी मवाळमतवादी नेत्यांना जवळ असलेला 'प्रशासकीय सुधारणा' हा विषय प्रभावीपणे मांडला. त्यांची 'इम्पिरियल कौन्सिल'मधील कामगिरीदेखील महत्त्वाची होती. जरी त्यांचा ब्रिटिशांच्या लोकशाहीवादी व समतावादी बुद्धीवर विश्वास असला, तरी त्यांनी 'इम्पिरियल कौन्सिल'मध्ये ब्रिटिशांच्या प्रमुख विरोधकाचीच भूमिका पार पाडली. आपल्या भाषणातून त्यांनी भारतीय लोकांच्या गरिबीवर, त्यांच्या आर्थिक शोषणावर, समाजसुधारणा, जातीय सलोखा व सार्वत्रिक शिक्षणाची गरज या विषयांवर जोर दिला. गोखल्यांनी राजकारणाचे आध्यात्मिकीकरण करण्याची शिकवण दिली. समाजामध्ये परिवर्तन आणण्याचा मार्ग हा शुद्ध, शांतिमय व योग्य असला पाहिजे, हे गोखल्यांचे 'राजकारणाच्या आध्यात्मिकी-करणा'चे तत्त्व होते. पुढील काळात त्यांच्या ह्या शिकवणुकीचा महात्मा गांधींवर प्रभाव पडला व काँग्रेसच्या राजकारणाला नवी दिशा मिळाली.

प्रारंभीच्या काळातील काँग्रेसचा सर्वांत मोठा विजय म्हणजे ब्रिटिश सरकारला बंगालची फाळणी रद्द करणे भाग पडले. १२ डिसेंबर, १९११ रोजी इंग्लंडचा राजा पंचम जॉर्ज याच्या सन्मानार्थ एक भव्य दरबार दिल्लीत भरविण्यात आला. या दरबारात दिल्लीचे भौगोलिक, ऐतिहासिक आणि राजकीय महत्त्व लक्षात घेऊन ब्रिटिश भारताची राजधानी कलकत्त्याहून दिल्ली येथे हलविण्यात आल्याची घोषणा करण्यात आली. त्याचप्रमाणे बंगाली जनतेतील असंतोषाची दखल घेतली जाऊन बंगालची फाळणी रद्द करण्यात आली. मात्र पूर्वीसारखा विशाल बंगाल न ठेवता बंगाली भाषिकांचा, सिल्हेट जिल्हा वगळता, बंगाल निर्माण करण्यात आला, शिवाय बिहार व ओरिसा हे प्रांतही बंगालपासून वेगळे करण्यात आले. सिल्हेट जिल्ह्याचा समावेश करून आसाम हा नवा प्रांत निर्माण करण्यात आला. बंगालची फाळणी रद्द केल्याच्या घोषणेने राष्ट्रवादी चळवळ थांबेल व शांतता नांदेलही ब्रिटिश सरकारची अपेक्षा मात्र सफल झाली नाही. भारतीय लोकांच्या राष्ट्रवादी भावना जागृत झाल्या होत्या. त्यांच्यात एक धाडसी व निर्भय वृत्ती निर्माण झाली होती. त्यांचा स्वाभिमान व स्वावलंबीपणा जागृत झाला होता. त्यांना लोकचळवळीत सहभागी होण्याची शिकवण मिळाली होती. त्यांनी राजकीय चळवळीतील त्यांच्या अनुभवावरून अनेक महत्त्वाचे धडे घेतले होते. काँग्रेसच्या प्रारंभीच्या काळात भारतीय लोकांना मिळालेली ही शिकवण भारतीय राष्ट्रवादासाठी एक क्रांतिकारी झेप होती. पुढील काळात काँग्रेसच्या नेत्यांनी आधी मिळालेला हा वारसा ब्रिटिशांना विरोध करण्यासाठी पूर्णपणे वापरला.

**संदर्भग्रंथ**


१) Argov Daniel, *Moderates and Extremists in the Indian Nationalist Movement 1883-1920*, Asia Publishing House, Bombay, 1967.

२) Chakrabarty D. and Bhattacharyya C. (Compiled by), *Congress in Evolution : A Collection of Congress Resolutions from 1885-1934*, The Book Company Ltd., Calcatta, 1935.

३) Chandra Bipan, *History of Modern India*, Orient BlackSwan, Hyderabad, 2009.

४) Chousalkar Ashok, *Indian Idea of Political Resistance*, Ajanta Publications, Delhi, 1990.

५) Johnson Gordon, *Provincial Politics*

*and Indian Nationalism : Bombay and the Indian National Congress 1880-1915*, Cambridge University Press, 1973.

६) Nevinson Henry, *The New Spirit in India*, Harper and Brothers, London, 1908.

७) Phadke Y. D., *विसाव्या शतकातील महाराष्ट्र: १९०१-१९१४*, Vol. 1, Shrividya Prakashan, Pune, 1989.

८) Ray Rajat Kanta, 'Moderates, Extremists and Revolutionaries : Bengal, 1900-1908' in Richard Sisson and Stanley Wolpert (eds.), *Congress and Indian Nationalism, University of California Press*, Berkeley, 1988.

९) Sarkar Sumit, *Modern India 1885-1947*, Macmillan India Limited, Madras, 1983.

१०) Seth Sanjay, Rewriting Histories of Nationalism : The Politics of "Moderate Nationalism" in India, 1870-1905, *American Historical Review*, Vol. 104, No. 1 (Feb. 1999), pp. 95-116.

११) Sitaramayya B. Pattabhi, *The History of the Indian National Congress, Volume I (1885-1935)*, Padma Publications Ltd., Bombay, 1935 (reprint 1946).

१२) Tilak Bal Gangadhar, *समग्र लोकमान्य टिळक, खंड ३, ४, ५*, Kesari-Maratha Sanstha, Pune, 1976.

१३) Tripati Amales, *The Extremist Challenge*, Orient Longman, Calcutta, 1967.

☆☆☆

# काल, आज आणि उद्या

## जवाहरलाल नेहरू आणि काँग्रेस

– साक्षी

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशी हिंदुस्थानात सत्तांतर झाले आणि भारत व पाकिस्तान ही दोन राष्ट्रे निर्माण झाली. सत्तांतराच्या प्रक्रियेतील एक पक्ष जो काँग्रेस (दुसरा पक्ष म्हणजे सत्ताधारी ब्रिटिश), तो भारतात सत्तेवर आला. १९४६ साली घटना-समिती अस्तित्वात आली होती. गांधींच्या आग्रहामुळे वल्लभभाई पटेल व कृपलानी यांनी काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी त्या वर्षी होणाऱ्या निवडणुकीतून माघार घेतली व जवाहरलाल नेहरू हे काँग्रेसचे अध्यक्ष झाले. साहजिकच सत्तांतराच्या पहिल्या टप्प्यात जे मध्यावधी 'मंत्रिमंडळ' तयार करण्यात आले, त्या मंत्रिमंडळाचे ते मुख्य झाले. परिणामी सत्तांतर पूर्ण झाल्यावर तेच पंतप्रधानही झाले. काँग्रेस पक्षावर व भारतीय जनतेवर स्वातंत्र्यानंतरची पहिली सतरा वर्षे नेहरूंचा अप्रतिहत प्रभाव राहिला.

आमच्या पिढीतील माणसे नेहरूंच्या कारकिर्दीत कुमारवयातून तारुण्यात आली. आमच्या विचारांवर, वर्तनावर आणि देशाच्या भवितव्याविषयी आम्हास पडणाऱ्या स्वप्नांवर नेहरूंच्या शिकवणीच्या पुसटशा का होईना, कांचनरेषा उमटल्या आहेत. नेहरूंचे साहित्य आम्ही वाचले आहे. त्यांची भाषणे ऐकली आहेत. गांधींच्या हत्येनंतर त्यांनी लिहिलेला एक भावनापूर्ण लेख आजही वाचला तरी माझ्यासारख्याचा गळा दाटून येतो. नेहरूंनी लिहिले होते- 'As he grew older his body seemed to be just a vehicle for the mighty spirit within him. Almost one forgot the body as one listened to him, or looked at him, and so where he sat became a temple and where he trod was hallowed ground ... Why then should we grieve for him? Our memories of him will be of the Master, whose step was light to the end, whose smile was infectious and whose eyes were full of laughter.' किंवा 'द डिस्कव्हरी ऑफ इंडिया'च्या अखेरीला त्यांनी लिहिलेला प्रेरणादायी संदेश- 'Man's dearest possession is life, and since it is given to him to live but once, he must so live as not to be scared with the shame of a cowardly and trivial past, so live as not to be tortured for years without purpose, that dying he can say "All my life and my strength were given to the first cause in the world- the liberation of mankind."' हे वाक्य कितीदाही वाचले, तरी अंगावर रोमांच उभे राहिल्याखेरीज राहत नाहीत. नेहरूंनी केलेल्या एका भाषणात तर ते आणि भारतीय जनता यांच्यातील प्रेमपूर्ण संबंधांचे सारच उतरले आहे. 'If any people choose to think of me, I would like them to say, that this man with all his mind and heart loved India and Indian people, and they in turn were indulgent to him and gave him their love most abundantly and extravagantly.' नेहरूंचे हे शब्द तंतोतंत खरे आहेत. नागड्या-उघड्या, अर्धपोटी, अशिक्षित व अज्ञानी, उखीर-वाखीर आणि उदासवाणे आयुष्य जगणाऱ्या भारतीय जनतेने नेहरूंच्या राजबिंड्या रूपावर, उसळत्या उत्साहावर, भविष्याला कवेत घेण्याची आतुरता व्यक्त करणाऱ्या चपळ हालचालींवर लुब्ध होऊन त्यांना आपल्या प्रेमाने न्हाऊ घातले होते.

नेहरूंचे व्यक्तित्व आणि व्यक्तिमत्त्व ही दोन्ही अतिशय आकर्षक होती. त्यांची लालसर अंगकांती, रुबाबदार शरीरयष्टी, नितळ डोळे, चेहऱ्यावर कायम हजर असणारे प्रसन्न स्मित, स्वभावातील ऋजुता दाखविणारे सरळ नाक, पावलांची झपझप, उच्च दर्जाच्या खादीचा अंगासरसा पोषाख, स्वच्छ पांढरी कडक घडीची टोपी व छातीवरील लालबुंद गच्च गुलाब या सर्वांचा

अनुक्रमणिका

एकत्रित परिणाम लोभसवाणा असे. कुसुमाग्रजांनी म्हटले होते :

इंद्राघरचे पिउनि रसायन प्रधान अमुचे आले.
अलकेतील चिरयौवन येथे रूप काश्मिरी ल्याले.

परंतु ज्यांनी नेहरूंना पाहिले नाही त्यांनाही त्यांच्या ध्येयवादाची, देशभक्तीची, भाषा-प्रांत-जात-धर्म यांच्या पलीकडे पोचणाऱ्या त्यांच्या सहानुभूतीची, मनुष्यजातीतील सर्व दीन-दलितांच्या मुक्तीचा ध्यास घेणाऱ्या त्यांच्या वैचारिकतेची मोहिनी पडत असे. त्यांची स्वच्छ व प्रेरक भाषाशैली; दुसऱ्याची विचारप्रणाली समजून घेण्याचा मोकळेपणा; दारिद्र्य, अज्ञान, कोंजेपणा, अंधश्रद्धा यांच्याविषयी वाटणारा तिटकारा; विज्ञान, तत्त्वज्ञान, अर्थकारण, समाजशास्त्र यांतील जटिल विचारांच्या गुंतागुंतीची उकल करण्याची त्यांच्या बुद्धीची क्षमता; त्यांना इतिहास व परंपरा यांच्याविषयी वाटणारी डोळस तरीही सश्रद्ध ओढ या सगळ्यांचे त्यांच्या व्यक्तिमत्त्वात काही अजबच मिश्रण झाले होते. कुसुमाग्रजांनी म्हटले आहे :-

थोडे पंडित, थोडे इंग्रज, थोडी मोगली शान,
कवि, मीमांसक, समाजवादी, गांधींचा अभिमान.

दवा पहाडी, कस्तुरि, केशर, प्रवंग सोमल काही
स्फटिकाचा घट, असे विलक्षण मिश्रण झाले नाही.

(१)

जवाहरलाल नेहरू हे काँग्रेस संघटनेत अगदी मुरलेले नेते होते. संयुक्त प्रांत प्रदेश काँग्रेस समितीचे ते १९२०-२२ अशी तीन वर्षे चिटणीस होते. म्हणजे अगदी खालच्या स्तरावरील अधिकारपदावरून त्यांनी संघटनेच्या कार्याला सुरुवात केली होती. नंतर १९२३-२५ व १९२७-२९ अशी सहा वर्षे त्यांनी काँग्रेसचे सरचिटणीस म्हणून काम केले होते. निरनिराळ्या प्रांतांतील तरुण कार्यकर्त्यांशी त्यांचा संबंध आला होता. स्वातंत्र्यपूर्व काळात १९२९, १९३६, १९३७ व १९४६ अशा चार वेळा ते काँग्रेसचे अध्यक्ष होते. थोडक्यात म्हणजे गांधींच्या नेतृत्वाखालील काँग्रेस संघटनेमध्ये त्यांनी सर्व पातळ्यांवर कसून काम केले होते. संघटनेचे नियम, निरनिराळ्या थरांतील काँग्रेस-समित्यांचे अधिकार, त्यांच्यातील गट व गटप्रमुख, काँग्रेस संघटनेकडे गोळा होणारा पैसा व त्यातून चाललेल खर्च याची नेमकी माहिती त्यांना असली पाहिजे. काँग्रेस पक्षाची मध्यवर्ती कचेरी अलाहाबादमधील नेहरूंच्या निवासस्थानीच होती. त्यामुळे काँग्रेसच्या नाडीवर त्यांचा हात सततच राहिला होता.

असे असले, तरी नेहरू हे नेहमीच संघटनेच्या परिघावर राहिले होते; निदान लोकांत तरी तशी समजूत असे. वल्लभभाई पटेल, राजेंद्र प्रसाद अशा गांधींच्या परिवारातील नेत्यांविषयी संघटनेतील दुसऱ्या फळीतील श्रीकृष्ण सिन्हा, द्वारकाप्रसाद मिश्रा, गोपीचंद भार्गव, हनुमंतय्या, चंद्रभानू गुप्ता यांच्यासारख्या मुरब्बी कार्यकर्त्यांना जी आत्मीयता वाटे, ती आत्मीयता नेहरूंविषयी वाटत नसावी. आपल्या महाराष्ट्रातील न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ, शंकरराव देव, स. का. पाटील हे नेते पटेलांच्या पठडीतील होते, हे प्रसिद्धच आहे. १९३० सालानंतर काँग्रेस-समाजवादी पक्षाची उभारणी झाली. त्या पक्षाचे जयप्रकाश नारायण, नरेंद्र देव, मिनू मसानी, अशोक मेहता व पटवर्धनबंधू (अच्युतराव व रावसाहेब) यांना नेहरूंविषयी–ते समाजवादी भाषा बोलत असल्याने–जवळीक वाटे. पण या समाजवादी नेत्यांना काँग्रेसपक्षाच्या संघटनेत कोणतेच महत्त्वाचे स्थान नव्हते आणि खुद्द नेहरू काँग्रेससमाजवादी पक्षाचे सभासदही नव्हते.

नेहरूंना काँग्रेसमध्ये महत्त्वाचे स्थान असले, तरी संघटना व नेहरू यांच्यात दुरावाही होता. त्यामुळे काँग्रेस कार्यकर्ते भ्रष्टाचारी होत आहेत, आपल्या ध्येयापासून विचलित होत आहेत, गटबाजी व अधिकारपदाची लालसा यांच्या आहारी जात आहेत, अशा तऱ्हेच्या तक्रारी नेहरूंच्या पत्रांतून, पत्रकांतून आणि भाषणांतून वारंवार आढळून येतात. राजेंद्र प्रसाद किंवा वल्लभभाई पटेल यांच्या ध्यानी काँग्रेस कार्यकर्त्यांचे अध:पतन येत नसेल, असे नाही. पण त्यांनी त्याविषयी जाहीर तक्रार केली नाही.

दुसरा भाग असा होता, की १९१७ साली रशियात साम्यवादी क्रांती झाली व सोव्हिएट युनियनची स्थापना झाली. कम्युनिस्ट पक्षाची एक जगद्व्यापी संघटना उभी राहिली. 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल'ची अधिवेशने भरू लागली व त्या संघटनेच्या मध्यवर्ती कचेरीतून देशोदेशींच्या कम्युनिस्ट पक्षांना आर्थिक मदत आणि मार्गदर्शन मिळू

लागले. खुद्द नेहरूंनी १९२७ साली सोव्हिएट युनियनला भेट दिली. पंचवार्षिक योजनांची आखणी व अंमलबजावणी यातून नवीन समाजाची उभारणी होते आहे, हे पाहून ते भारावून गेले. त्यांच्या लेखांतून व भाषणांतून समाजवादाची आरती होऊ लागली. काँग्रेसने शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या संघटना उभाराव्यात, ही काँग्रेस समाजवाद्यांची मागणी नेहरू उचलून धरू लागले. राजेंद्र प्रसाद, पटेल व इतर गांधीवादी नेत्यांना वाटत असे, की काँग्रेसचे ध्येय स्वातंत्र्य मिळवणे हे आहे. त्यासाठी काँग्रेस ही सर्वसमावेशक संघटना राहिली पाहिजे. आपण शेतकरी-कामकरी-संघटना बांधू लागलो, तर भांडवलदार व जमीनदार हे संख्येने थोडे पण समाजातील शक्तिशाली घटक काँग्रेसपासून दूर जातील. काँग्रेसने 'दरिद्री नारायणा'ची सेवा जरूर केली पाहिजे; पण त्यासाठी खादी-ग्रामोद्योग-मंडळ ही काँग्रेसची उपसंघटना आहेच.

एप्रिल १९३६ मध्ये काँग्रेसचे अधिवेशन लखनौला भरले. नेहरूंनी आपल्या अध्यक्षीय भाषणात असे मत व्यक्त केले, की काँग्रेस ही फक्त मध्यमवर्गीयांची संघटना असून श्रमकरी रयतेशी तिचा कोणताच लागाबांधा निर्माण झालेला नाही. आजही शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या संघटना अस्तित्वात आहेत. आपण अशा संघटनांना काँग्रेसचे सभासदत्व दिले पाहिजे. म्हणजे काँग्रेसच्या घटनेत व्यक्तिगत सभासदत्व व संघटनेचे सभासदत्व असे सभासदत्वाचे दोन प्रकार राहतील. असे झाल्यास काँग्रेस ही एकाच वेळी श्रमकरी रयतेची आणि साम्राज्यविरोधकांची बलाढ्य संघटना होईल. नेहरूंनी अशी सूचना केली, की हे कसे घडवून आणायचे, यासाठी एक समिती नेमावी.

त्यानंतर काँग्रेसच्या विषयनियामक समितीची बैठक झाली. तिच्यापुढे काँग्रेससमाजवादी पक्षाचे अच्युत पटवर्धन, अजितप्रसाद सिन्हा व कमलादेवी चट्टोपाध्याय यांनी असा ठराव मांडला, की "स्वातंत्र्याच्या लढ्यात कष्टकरी रयतेला समाविष्ट करून घेतले पाहिजे, याची जाणीव काँग्रेसला झाली आहे. त्यामुळे काँग्रेस आपल्या कार्यकारिणीला असे सुचवते आहे, की शेतकरी संघटना व कामगार संघटना यांच्याशी विचार-विनिमय करून कार्यकारिणीने काँग्रेसच्या घटनेत योग्य ते बदल करावेत आणि या संघटनांच्या प्रतिनिधींना काँग्रेसमध्ये स्थान मिळेल, अशी तरतूद करावी."

हा ठराव विषयनियामक समितीपुढे चर्चेला आला, तेव्हा समितीतील 'गांधीवादी' सभासदांनी असा आग्रह धरला, की "काँग्रेस कार्यकारिणीने शेतकरी-कामगार संघटनांशी अधिक जवळीक साधून साम्राज्यविरोधकांची एक संयुक्त आघाडी निर्माण करण्याचे प्रयत्न करावेत," इतक्याच आशयाचा ठराव करावा. 'गांधीवाद्यां'चे बहुमत असल्याने ठराव त्याच प्रकारचा झाला. काँग्रेसच्या खुल्या अधिवेशनात पुरुषोत्तमदास टंडन व आचार्य कृपलानी यांनी विषयनियामक समितीत मंजूर झालेला मवाळ ठरावच मांडला. तेव्हा समाजवाद्यांचे प्रवक्ते संपूर्णानंद यांनी 'शेतकरी-कामगारांच्या संघटनांच्या प्रतिनिधींना काँग्रेसमध्ये स्थान द्यावे', अशी दुरुस्ती मांडली. या ठरावावर बरीच वादावादी झाली. गांधीवाद्यांचे पुढारी जयरामदास दौलतराम यांनी सांगितले, की "वर्गीय संघटनांना काँग्रेसमध्ये स्थान दिल्यास काँग्रेसमध्ये दुफळी माजून काँग्रेस दुबळी होईल." यानंतर संपूर्णानंदांची दुरुस्ती मताला टाकली व ती २५५ मते बाजूने व ४८७ मते विरुद्ध असे विभाजन होऊन फेटाळली गेली. टंडन व कृपलानी यांचा मूळ ठराव मंजूर झाला.

पुढे काँग्रेसने एक रयत-संपर्क-समिती स्थापन केली. अध्यक्षपदी जयरामदास दौलतराम हे होते. राजेंद्र प्रसाद आणि जयप्रकाश नारायण हे दोघे सभासद होते. या समितीने मे १९३६ मध्ये जिल्हा काँग्रेस समित्यांना एक चारपानी प्रश्नावली पाठवून सांगितले, की या प्रश्नांची उत्तरे लिहून ते कागद प्रदेश काँग्रेस समित्यांकडे पाठवा; म्हणजे प्रदेश समित्या उत्तरांचे विश्लेषण करून एकत्रित अहवाल रयत-संपर्क-समितीला (रसंस) पाठवितील. तथापि झाले असे, की वर्ष संपत आले तरी फक्त १० अहवाल प्रदेश समित्यांकडून आले व १२ अहवाल जिल्हा समित्यांकडून आले. त्यावरून असे कळून आले, की जिल्हा समित्यांची स्थिती दयनीय होती. फारच थोड्या जिल्हा-समित्यांना स्वतःच्या कचेऱ्या होत्या. बहुतेक वेळा जिल्हा समितीची कचेरी म्हणजे 'जिल्ह्यातील कोणा गृहस्थाचा खिसा, टेबलाचा कप्पा, अगर फारतर घरचे कपाट' यातच ठेवलेली असे! दुसरे असे की, काँग्रेसची

धोरणे, निर्णय व कार्यक्रम जिल्हा समित्या किंवा त्याहून खालच्या पातळ्यांवरील (उदा., तालुका समित्या किंवा ग्रामसमित्या) समित्यांपर्यंत पोचतच नसत. मग ही धोरणे व कार्यक्रम ठरविताना अशा निम्न पातळीवरील समित्यांची मते अजमावण्याची गोष्ट दूरच राहिली!

'रसंस'ने विचारले होते, की "ग्रामीण, तालुका किंवा जिल्हा पातळीवरील काँग्रेससमित्या तळागाळातील रयतेशी संपर्क कसा साधतात?" त्याला बहुतेक समित्यांचे उत्तर असे होते की, "आमच्या भागात पूर, साथ, दुष्काळ अशांसारखी संकटे उद्‌भवतात, तेव्हा आमचे कार्यकर्ते लोकांत जाऊन काम करतात व संबंध जोडतात."

'रसंस'ने काँग्रेससमित्यांना विचारले होते, की 'शेतकरी-कामगारांच्या संघटनांना काँग्रेसमध्ये स्थान द्यावे का?' ज्या काँग्रेस नेत्यांनी सुरुवातीपासूनच शेतकऱ्यांच्या संघटना बांधून कामाला सुरुवात केली होती (उदा. एन्. जी. रंगा, स्वामी सहजानंद सरस्वती, ई. एम्. एस्. नंबूद्रीपाद) त्यांनी या सूचनेला जोरदार पाठिंबा दिला. पण त्यांच्या हवाली असणाऱ्या काँग्रेससमित्या फारच थोड्या होत्या. बहुतेक सर्व काँग्रेससमित्यांनी ही सूचना धुडकावून लावली.

'रसंस'ने स्वतःचा असा कोणताच अहवाल काँग्रेस कार्यकारिणीला दिला नाही. राजेंद्र प्रसाद व जयप्रकाश नारायण यांनी आपापले अहवाल लिहिले. दोघांनीही निम्न स्तरावरील काँग्रेससमित्यांना महत्त्व द्यावे, जनसंपर्क साधावा, यावर भर दिला. पण शेतकरी-कामगार संघटनांना संघटना म्हणून काँग्रेसवर प्रतिनिधित्व द्यावे याला प्रसादांनी ठाम विरोध केला, तर नारायण यांनी पूर्ण पाठिंबा दिला. या परिस्थितीचा विचार ३६ सालच्या अखेरीला काँग्रेस कार्यकारिणीने करून मूळच्या 'रसंस'मध्ये नेहरू व कृपलानी हे आणखी दोन सदस्य घातले व समितीची कार्यकक्षा ठरविताना म्हटले, की 'तळागाळातील कार्यकर्त्यांच्या उपक्रमशीलतेला वाव मिळावा आणि काँग्रेस-संघटना अधिक प्रभावी व्हावी, यासाठी काँग्रेसच्या घटनेत काय बदल करता येतील, याच्या सूचना द्याव्यात.'

त्यानंतर डिसेंबर १९३६ मध्ये काँग्रेसचे अधिवेशन फैझपुरला भरले. नेहरूच पुनः अध्यक्ष होते. त्या वेळी अच्युतराव पटवर्धन यांनी शेतकरी-कामगार संघटनांना काँग्रेसवर प्रतिनिधित्व देण्याचा प्रश्न परत मांडला. तथापि त्या आशयाचा ठराव फेटाळला गेला. नंतर ३७ सालच्या निवडणुका आल्या. त्या निवडणुकांत काँग्रेसच्या प्रचारासाठी नेहरू व इतर नेत्यांनी तुफानी दौरे काढले. त्या दौऱ्यांना व नेत्यांच्या सभांना, ज्यांना निवडणुकीत मतदान करण्याचा हक्कही नव्हता, अशा रयतेने इतका प्रचंड प्रतिसाद दिला, की काँग्रेसने रयतेला आपलेसे करण्यासाठी काही विशेष प्रयत्न करावेत, अशी गरजच वाटेनाशी झाली.

निवडणूकप्रचारासाठी दौरे करण्याचा व सभा घेण्याचा हा नेहरूंचा पहिलाच अनुभव होता. यापूर्वी काँग्रेसने स्वतःच्या झेंड्याखाली निवडणूक लढविलीच नव्हती. तथापि, त्या विराट सभा, तिथे होणारा जयजय-कार, अफाट जनसमुदाय आपला प्रत्येक शब्द आतुरतेने झेलत आहे हा अनुभव, यामुळे आपले नेतृत्व वलयांकित आहे, याचा प्रत्यय नेहरूंना आला असला पाहिजे. आपण काँग्रेस संघटनेचा आधार न घेताही जनतेपर्यंत पोचू शकतो, याची खात्री त्यांना पटली. इतकेच नव्हे तर शेतकरी-कामगारांच्या स्वतंत्र संघटना असतीलही; पण त्या, आपण व हे श्रमिक यांच्या दरम्यान येऊ शकत नाहीत, हाही विश्वास त्यांना वाटला असला पाहिजे. स्वातंत्र्याची चळवळ व त्यासाठी आपण केलेला त्याग यांच्यामुळे आपण व जनता यांच्यात वेगळेच नाते आपसुक जुळले आहे, हे त्यांना कळून चुकले. त्यामुळे, कदाचित, काँग्रेस संघटनेविषयी काही उपेक्षेची भावना त्यांच्या ठिकाणी निर्माण झाली. याचे परिणाम पुढे दिसून आले. कसे ते पाहू.

(२)

व्यक्तिशः नेहरूंचे नेतृत्व वलयांकित होते, तरी त्यांना त्यांचे स्थान संसदीय काँग्रेस पक्षाचे नेता म्हणून प्राप्त झाले होते व या संसदीय काँग्रेस पक्षावर पटेलांचा पगडा होता. राज्यकारभारात दर घडीला नवीन प्रश्न उपस्थित होत. ते सोडवताना संसदीय काँग्रेस पक्षाची (संकॉप) मान्यता घ्यावी लागे. अशा वेळी नेहरूंच्या कीर्तिवलयापेक्षा पटेलांची संकॉपवरची पकडच जास्त उपयोगाला येई. हा अनुभव नेहरूंना हैद्राबादच्या प्रश्नासंबंधी आला; पूर्व बंगालमधून येणाऱ्या निर्वासितांच्या

लोंढ्यावर उपाय करण्याची वेळ आली तेव्हा आला आणि पहिले राष्ट्रपती निवडतानाही आला. २६ नोव्हेंबर १९४९ रोजी घटना तयार झाली व २६ जानेवारी १९५० पासून ती अमलात येणार होती. इतक्या दोन महिन्यांच्या काळात पहिल्या राष्ट्रपतींचे नाव (प्रामुख्याने) काँग्रेस पक्षाने नक्की करावयाचे होते. जून १९४८ मध्ये अखेरचे इंग्रज गव्हर्नर जनरल (ग. ज.) मौंटबॅटन हे इंग्लंडला परत गेले. तेव्हापासून राजगोपालाचार्य (राजाजी) हे ग. ज.चे काम पाहात होते. साहजिकच राष्ट्रपतिपदासाठी त्यांच्या नावाची चर्चा होती. तथापि काँग्रेस पक्षातील बहुसंख्य लोकांना राजाजी मान्य नव्हते. १९४२ सालच्या चळवळीला राजाजींनी विरोध केला होता. पुढे १९४४ साली लीगचा पाठिंबा स्वातंत्र्यचळवळीस मिळावा यासाठी राजाजींनी एक तडजोडीचा मसुदा तयार केला होता. त्या मसुद्यात पाकिस्तानला मान्यताच दिली होती. मात्र या मसुद्यानुसार आधी हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पाकिस्तान अस्तित्वात येणार होते. खुद्द नेहरूंना राजाजींच्या या दोन्ही खेळ्या मान्य नव्हत्या. पण नेहरूंच्या लेखी या जुन्या गोष्टी झाल्या होत्या. सध्याच्या परिस्थितीत सरकारसमोर अनेक घोर प्रश्न उभे होते. पूर्व बंगालमधून हिंदू निर्वासितांचे लोंढे येत होते. त्यामुळे बंगाल व बिहारमध्ये हिंदू जातीयवादी विचार जोरावर होते. खुद्द पूर्व बंगालचे मुख्यमंत्री बिधनचंद्र रॉय यांनी म्हटले होते, की 'हिंदूंचे विस्थापन चालूच राहिल्यास पश्चिम बंगालमधील मुसलमानांना पूर्व बंगाल-मध्ये पाठवावे लागेल.' हिंदू कोड बिलाबाबतही मतभेद होते. अशा वेळी राजाजींसारखा खंदा वादपटू आणि पुरोगामी (?) विचारांचा जाणता मनुष्य राष्ट्रपतिपदावर यावा, अशी नेहरूंची इच्छा होती.

खुद्द पटेलांचा राजाजींना व्यक्ती म्हणून विरोध नव्हता. राजाजी राष्ट्रपती झाल्यावर नेहरूंना वचकून राहतील, अशी भीतीही त्यांना वाटत नव्हती. मात्र घटना-समितीचे अध्यक्ष असलेले राजेंद्र प्रसाद हे राष्ट्रपतिपदाचे उमेदवार म्हणून पुढे आल्यास राजाजींचा पराभव होणार हे निश्चित, असे पटेलांचे मत होते. राजाजी काँग्रेसपक्षात जितके अप्रिय होते, तितकेच प्रसाद प्रिय होते. ते काँग्रेसशी एकनिष्ठ होते. अगदी सुरुवातीपासून ते गांधींचे सच्चे अनुयायी म्हणून वावरले. घटनासमितीचे अध्यक्ष म्हणून त्यांनी उत्कृष्ट कामगिरी केली. त्यामुळे पटेलांना वाटे, की राजेंद्र प्रसादांनाच राष्ट्रपतिपदासाठी काँग्रेसचे नामांकन मिळावे. अडचण इतकीच होती, की नेहरू व राजाजी यांनी गळ घातली तर प्रसादांनी 'मला या पदाची महत्त्वाकांक्षा नाही', असे जाहीर केले असते.

सप्टेंबर १९४९ च्या अखेरीला नेहरू अमेरिकेच्या दौऱ्यावर जाणार होते. त्यापूर्वी राष्ट्रपतिपदाचा उमेदवार ठरवावा, अशी त्यांची इच्छा होती. म्हणून १० सप्टेंबर १९४९ रोजी नेहरूंनी प्रसादांना अशा आशयाचे पत्र लिहिले, की 'मी वल्लभभाईंशी राष्ट्रपतिपदाच्या निवडणुकीची चर्चा केली. आमचे असे मत झाले, की ग. ज. पदावर असलेले राजाजी यांनाच राष्ट्रपतिपदावर ठेवावे. म्हणजे माणसांची कमीतकमी फिरवा-फिरवी करून काम चालू ठेवता येईल. अर्थात, तुम्ही राष्ट्रपतिपदासाठी उत्तमच उमेदवार आहात. पण तुम्हाला नामांकन दिल्याने बरेच फेरबदल करावे लागतील. त्यातून आता राजाजींना बाजूला सारणे म्हणजे त्यांनी (ग. ज.म्हणून) केलेल्या कामाबद्दल नापसंती दाखविल्यासारखे होईल. म्हणून वल्लभभाई व मी असे सुचवतो की, राजाजींनाच नामांकन मिळावे. तुम्ही स्वतःच राजाजींचे नाव नामांकनासाठी सुचवणे उचित होईल.'

त्याला राजेंद्र प्रसाद यांनी खालील आशयाचे समर्पक उत्तर दिले. 'तुम्ही राष्ट्रपतिपदासाठीच्या उमेदवारांची चर्चा करीत आहात, अशी मला अंधूकशी कल्पना जरी परोक्ष-रीत्या मिळाली असती, तरी मी स्वतःहून सांगितले असते की, राजाजींना उमेदवारी द्या. परंतु, मी तुमच्या विश्वासातील मनुष्य आहे, अशी मी स्वतःची निष्कारणच समजूत करून घेतली होती. आता तुम्ही निर्णय मला न विचारता घेतलाच आहे, तर तो मी स्वीकारलाच पाहिजे. राजाजींचे नामांकन मी करावयाचे असेल, तर मला घटनासमितीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा द्यावा लागेल. त्यालाही माझी हरकत नाही.'

नेहरूंच्या पत्राची प्रत व त्या पत्राला आपण पाठविलेल्या उत्तराची प्रत प्रसादांनी पटेलांना पाठविली, तेव्हा पटेल गडबडलेच. त्यांनी प्रसादांना लिहिले की, 'माझे व नेहरूंचे बोलणे जून १९४९ मध्ये झाले होते. तुम्ही

अनुक्रमणिका

आणि मी, आपल्यात कधीच कोणताच दुरावा नव्हता व पुढेही तो येणार नाही.' प्रसादांच्या पत्राला उत्तर देताना नेहरूंनी मान्य केले, की 'राष्ट्रपतिपदाच्या नामांकना-विषयी माझे व पटेलांचे बोलणे झाले नव्हते. झाल्या गोष्टीविषयी मला दुःख होते.'

तथापि नेहरूंनी राजाजींना राष्ट्रपतिपदावर बस-विण्याचा प्रयत्न सोडला नाही. अमेरिकेला जायला निघण्याच्या आदल्या दिवशी घटनासमितीतील काँग्रेस-प्रतिनिधींची सभा भरली असताना त्यांनी 'राजाजींना नामांकन द्यावे', अशा अर्थाचा ठराव मांडला. त्या ठरावा-वर गदारोळ माजला. अनेक सभासदांनी आपली संतापी प्रतिक्रिया अशोभनीय भाषेत व्यक्त केली. वाद हाताबाहेर जाणार असे वाटू लागले, तेव्हा पटेलांनी सांगितले की, "सध्या या ठरावावरील चर्चा तहकूब ठेवू. यापूर्वी आपण याहून अवघड प्रश्नातून मार्ग काढला आहे. पंतप्रधान महत्त्वाच्या दौऱ्यावर जात आहेत. अशा वेळी कटुता व किल्मिष कोणाच्याच मनात असू नये." पटेलांच्या हस्त-क्षेपामुळे नेहरूंचा ठराव फेटाळला जाण्याची नामुष्की झाली नाही. सभेनंतर नेहरू साहजिकच उद्विग्न झाले होते. आपल्या पक्षावर आपले वर्चस्व नाही, हे शल्य त्यांना बोचत होते. पटेलांना त्यांनी पत्र लिहिले व पंत-प्रधानपदाचा राजीनामा देण्याची तयारी दाखविली. दुसऱ्या दिवशी सकाळी अमेरिकेच्या दौऱ्यावर निघण्यासाठी नेहरू विमानतळावर गेले असताना पटेल त्यांना भेटले. पटेलांनी नेहरूंची समजूत घातली व शांत चित्ताने या महत्त्वाच्या प्रवासाला लागा, असे सांगितले.

दौऱ्यावरून नेहरू ५ आठवड्यांनी परतले व त्यानंतर त्यांनी राजाजींना राष्ट्रपतिपदावर बसविण्याचे प्रयत्न पुनः सुरू केले. ह्या वेळपर्यंत पटेलांनीही निर्णय घेतला होता की, प्रसादांना राष्ट्रपती करावयाचे. नेहरूंच्या दबावाला बळी पडून प्रसादांनी माघार घेऊ नये यासाठी पटेलांनी प्रसादांना सुचविले की, त्यांनी काही दिवस राजकारणा-पासून दूर वर्ध्याला जाऊन राहावे. त्यानंतर ८ डिसेंबर १९४९ रोजी नेहरूंनी प्रसाद वर्ध्याला असताना एक मोठे पत्र त्यांना धाडले. त्यात काँग्रेसची ढासळती शिस्त, देशापुढील प्रश्न यांचा बराच खल केल्यावर म्हटले होते, "आता राष्ट्रपतींच्या निवडणुकीची वेळ आली आहे. ही निवडणूक एकमताने व्हावी, काँग्रेसचे दोन ज्येष्ठ नेते परस्परांविरुद्ध निवडणूक लढवीत आहेत असे होऊ नये, ही सर्वांचीच इच्छा आहे. म्हणून निवडणूक घेण्याची घोषणा होण्यापूर्वीच काँग्रेसपक्षाने आपला निर्णय जाहीर केला पाहिजे. प्रश्न तुम्ही आणि राजाजी यांच्यातलाच आहे. तुम्हापैकी एकाने माघार घेतली, तर साजरे होईल... कालच राजाजींशी माझी गाठ पडली होती. त्यांनाही या परिस्थितीत फार अवघडल्यासारखे झाले आहे. निवृत्त होऊन खेड्यात जाऊन राहावे, असे त्यांच्या मनाने घेतले आहे. पण असे केल्यास आपण सहकाऱ्यांना वाऱ्यावर सोडले व कर्तव्यापासून माघार घेतली असे तर होत नाही ना, अशी शंका त्यांना वाटते. सारांश, निर्णय घेणे निकडीचे झाले आहे. मी पटेल व मौलाना यांच्याशीही बोललो आहे. तरी या बाबतीत तुमचा सल्ला कळवावा."

प्रसादांनी १२ डिसेंबरला या पत्राला उत्तर देताना म्हटले, की "पदाची आसक्ती माझ्या मनात कोठे आहे का, याचा मी कसून शोध घेतला. मी प्रामाणिकपणे सांगतो, की अशी आसक्ती मला आढळली नाही. पण मला असेही वाटते, की विधिमंडळ काँग्रेस पक्षाची इच्छा बाजूला सारून मी 'राष्ट्रपतिपद मला नको' असे म्हटले तर लोकांना वाटेल की, तुम्ही आणि सरदार यांनी जबरदस्तीने मला खाली बसवले. अशी लोकांत समजूत पसरणेही इष्ट नाही. तेव्हा तुम्ही, सरदार व मौलाना अशा तिघांनीच काय तो निर्णय करावा." राजेंद्र प्रसादांनी नेहरूंचे पत्र व आपले उत्तर यांच्या प्रती पटेलांकडे पाठवून दिल्या.

पटेलांनी प्रसादांना लिहिले, "नेहरू व मौलाना यांचा कल तुम्हाला माहीतच आहे. तेव्हा तुम्ही सर्वभार माझ्या-वरच टाकला आहे. काय करावे, हा प्रश्नच आहे. जवाहरलाल यांच्याशी भेट होईल, तेव्हा बघू." नेहरूंच्या भेटीत पटेलांनी नेहरूंना पटवून दिले, की काँग्रेस विधि-मंडळ पक्षाचा विरोध पाहता राजाजी निवडून येणे अशक्य आहे. नेहरूंना माघार घ्यावी लागली व राजेंद्र प्रसाद राष्ट्रपती झाले.

सारांश, काँग्रेससंघटना व विधिमंडळ काँग्रेसपक्ष यांनी नेहरूंच्या वलयांकित नेतृत्वाची भीड बाळगली नाही. पक्षसंघटना व पक्षाचे कायदेमंडळातील प्रतिनिधी

यांना बाजूला ठेवून नेहरू जनसामान्यांना हाक घालू शकले असते. पण त्यामुळे राष्ट्रपतिपदावर त्यांचा उमेदवार निवडून येऊ शकला नसता. पुढे इंदिरा गांधींच्या कारकिर्दीत हाच प्रश्न निर्माण झाला. त्या वेळी इंदिरा गांधींनी आपल्याच पक्षाच्या उमेदवाराला पाडून गिरी यांना निवडून आणले. (विशेष म्हणजे काँग्रेस उमेदवार संजीव रेड्डी यांच्या नामांकनपत्रावर इंदिरा गांधींनी सही केली होती.) पण त्या वेळी दोन गोष्टी इंदिरा गांधींना अनुकूल होत्या. एक, अनेक विरोधी पक्षांची त्यांना मदत होती व विरोधी पक्षांकडेही पुष्कळ मते होती; आणि दुसरे, काँग्रेस संसदीय पक्षाला एकत्र ठेवील असा पटेलांसारखा नेता तेव्हा काँग्रेससंघटनेत नव्हता. काही असले तरी हे स्पष्ट झाले, की जनसामान्यातील लोकप्रियता ही जमेची बाजू खरी; पण त्या आधारावर पक्षसंघटना व संसदीय पक्ष यांची उपेक्षा करून चालत नाही.

(३)

१९५२ सालच्या जानेवारीत भारतात पहिली सार्वत्रिक निवडणूक होणार होती व पहिल्यांदाच एकवीस वर्षांवरील सर्व नागरिकांना मतदानाची संधी मिळणार होती. नेहरूंचे रयतेशी जुळलेले गाढ भावनिक नाते ही या निवडणुकीत काँग्रेसच्या दृष्टीने महत्त्वाची जमेची बाजू होती. काँग्रेस संसदीय पक्षाचा जो अनुभव १९५० साली झालेल्या राष्ट्रपतींच्या निवडीच्या वेळी आला होता, तो लक्षात घेता नेहरूंची साहजिकच इच्छा होती, की काँग्रेस आपले उमेदवार ठरवील, तेव्हा आपल्या स्वतःच्या (पक्षी : नेहरूंच्या) पुठ्ठ्यातील व्यक्तींना उमेदवारी मिळाली पाहिजे. या वेळी लोकसभा व राज्यांच्या विधानसभा यांच्या निवडणुका एकदमच होणार होत्या. निरनिराळ्या राज्यांतील काँग्रेसच्या शाखांत गटबाजी होतीच. प्रत्येक गटाची आतुरता हीच होती, की आपल्या गटाच्या व्यक्तींना आमदारपदासाठीची उमेदवारी पक्षाकडून दिली गेली पाहिजे. उत्तर प्रदेश हे देशातील सर्वांत मोठे राज्य होते. त्या राज्यातून ८५ खासदार निवडले जाणार होते. उत्तर प्रदेशातील काँग्रेस पक्षात दोन गट होते. मुख्यमंत्री गोविंद-वल्लभ पंत, चंद्रभानू गुप्ता व पुरुषोत्तम दास टंडन यांचा एक गट व रफी अहमद किडवाई, अजित प्रसाद जैन आणि महावीर त्यागी यांचा दुसरा गट. पहिला गट सत्तारूढ होता. दुसरा गट स्वतःला 'डाव्या विचारांचा व नेहरूंचा पक्षपाती' असे म्हणवून घेत असे.

साहजिकच काँग्रेसचे उमेदवार ठरविणारी जी 'काँग्रेस निवडणूक समिती' (काँनिस) तिच्यावर कोण प्रतिनिधी असतील, याला फार महत्त्व आले. काँनिसमध्ये काँग्रेस संसदीय मंडळाचे सर्व सदस्य – म्हणजे नेहरू, पटेल, आझाद, राजाजी, काँग्रेसचे अध्यक्ष– असतच; शिवाय काँग्रेस कार्यकारिणीने नेमलेले ५ प्रतिनिधी असत. त्याकाळात काँग्रेस कार्यकारिणीच्या सदस्यांची नेमणूक काँग्रेसचा अध्यक्षच करीत असे. हा हिशेब पाहता १९५०-५१ सालाकरता काँग्रेसचा अध्यक्ष कोण होणार. हा कळीचा प्रश्न होऊन राहिला होता.

नवीन अध्यक्षाच्या निवडणुकीविषयीच्या हालचालींना मे १९५० मध्ये नेहरू व पटेल यांची भेट झाली, तेव्हा सुरुवात झाली. दोघांच्या चर्चेत तीन नावे पुढे आली. ती म्हणजे शंकरराव देव, आचार्य कृपलानी आणि पुरुषोत्तमदास टंडन. देव हे महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचे नेते होते. त्यांनी डिसेंबर १९३६ मध्ये काँग्रेसचे अतिशय यशस्वी अधिवेशन महाराष्ट्रात फैजपुर येथे संपन्न करून दाखविले होते. ते काँग्रेसचे जुने, जाणते व गांधीवादी नेते होते. अनेक वर्षे काँग्रेसचे सरचिटणीस होते. स्वातंत्र्यासाठी फकिरी पत्करलेले व तुरुंगात आसुडाचे फटके ज्यांनी खाल्ले होते, असे ते नेते होते. तथापि, नेहरू व पटेल दोघांचेही मत असे होते, की देवांचे सर्व राजकारण व धोरण महाराष्ट्रकेंद्रित होते. देशभराचा आढावा घेऊन निर्णय घेण्याची त्यांची वृत्ती नव्हती. आचार्य कृपलानी हेही मुरब्बी पुढारी होते. १९४७ साली ते काँग्रेसचे अध्यक्ष होते. अनेक वर्षे काँग्रेसचे चिटणीसपद त्यांच्याकडे होते. परंतु, नेहरूंना कृपलानींविषयी ममत्व वाटत नव्हते. टंडन (१८८२-१९६२) हे एक तालेवार पुढारी होते. उत्तर प्रदेश व एकंदर हिंदीभाषिक प्रांतात १९२० च्या आसपास हिंदी भाषा उर्दूच्या वर्चस्वापासून मुक्त करावी व हिंदी ही फारसी लिपीत लिहिली न जाता देवनागरीत लिहिली जावी, यासाठी मोठी चळवळ झाली. त्या चळवळीचे ते नेते होते. स्वातंत्र्याच्या चळवळीत त्यांनी हिरिरीने भाग घेऊन तुरुंगवास सोसला होता. नेहरूकुटुंबीयांशी

ते जवळून परिचित होते. जवाहरलाल नेहरूंविषयी त्यांना कौतुक वाटत असे व त्यांनी नेहरूंचे गुणगान करणारे लेख लिहिले होते. १९५० साली ते उत्तर प्रदेशाच्या (उप्र) विधिमंडळाचे अध्यक्ष होते. आदल्या वर्षी (१९४९) झालेल्या अध्यक्षीय निवडणुकीत ते पट्टाभी सीतारामय्या यांच्याकडून थोडक्या मतांनी पराभूत झाले होते. पण नेहरूंना वाटे, की टंडन हे जुन्या विचारांचे व सनातनी वृत्तीचे पुढारी आहेत. पटेलांनी सांगितले, की देवविरुद्ध टंडन अशी लढत झाल्यास टंडन विजयी होतील, यात शंका नाही. तेव्हा टंडननाच एकमताने निवडावे, हे योग्य होईल. निर्णय काहीच झाला नाही.

नंतर नेहरूंनी टंडन यांच्याविषयीची आपली नावड खासगीत व्यक्त करायला सुरुवात केली. आपण वर पाहिलेच आहे, की उप्र.मधील पंत-गुप्ता गटात टंडन मोडत असत व किडवाई-जैन गटाचा पंत-गुप्ता गटाला विरोध होता. जेव्हा किडवाईंनी पाहिले, की टंडनना आव्हान देईल असा उमेदवार रिंगणात नाही व टंडन अध्यक्ष झाले तर ५२ सालच्या निवडणुकांत आपल्या गटाला जागाच मिळणार नाहीत, तेव्हा त्यांनी कृपलानींना भरीस घालून निवडणुकीत उतरवले. टंडन हे नेहरूंच्या पसंतीचे उमेदवार नव्हतेच; पण कृपलानीदेखील नेहरूंना नकोच होते. अशा स्थितीत कृपलानींना निवडणूक लढवायला किडवई भरीस घालू शकले आणि कृपलानींच्या उमेदवारीस नेहरूंची संमती त्यांनी मिळवली. हा त्यांच्या कारस्थानीपणाचा विजय होता. आता मुख्य लढत टंडन आणि कृपलानी यांच्यात होती. देव बाजूला पडले होते.

कृपलानींची उमेदवारी ठरल्यावर नेहरूंनी 'दगडापेक्षा वीट मऊ' या विचाराने कृपलानींना पाठिंबा दिला. म्हणजे टंडन विरुद्ध कृपलानी ही निवडणूक आता पटेल व नेहरू यांच्यातील लढत झाली. नेहरू आपल्या खासगी पत्रातून सांगू लागले, की टंडन यांनी नेमलेल्या कॉंग्रेस कार्यकारिणीत मी काम करणार नाहीच; पण पंतप्रधान म्हणून काम करणेही मला शक्य होणार नाही. तथापि, पटेलांना अशी खात्री होती, की टंडन निवडून आल्यानंतर नेहरू नवीन परिस्थितीशी जुळवून घेतील. याच काळात नेहरू व पटेल यांच्यात राज्यकारभारातील घटनांवरून कुरबुरी चालूच होत्या. पण इथे त्याचे विवेचन करण्याची गरज नाही. ऑगस्ट १९५० मध्ये निवडणूक झाली. टंडन यांना १३०६ मते पडली तर कृपलानींना १०९२. सप्टेंबरमध्ये नाशिकला कॉंग्रेसचे अधिवेशन झाले. वर वर पाहता असे वाटू लागले की, पटेलांनी अंदाज केला होता त्याप्रमाणे, नेहरू नवीन वातावरणाशी जुळवून घेत आहेत. यानंतर १५ डिसेंबर १९५० रोजी पटेल मुंबईत निधन पावले व टंडन यांचा मोठाच आधार तुटला.

आता नेहरूंनी कॉंग्रेस पक्षावर आपली पकड बसविण्यासाठी बाह्या सरसावल्या. एका बाजूला नेहरू व विरुद्ध बाजूला टंडन, पंत, स. का. पाटील, द्वारका प्रसाद मिश्रा, रविशंक शुक्ला व जगजीवनराम इत्यादी कॉंग्रेस संघटनेत वर्षानुवर्षे मुरलेले कडवे लोक यांच्यातील झगडा जानेवारी १९५१ पासून सप्टेंबर १९५१ पर्यंत नऊ महिने चालला. या रस्सीखेचीचे तपशीलवार वर्णन मिश्रा यांनी केले आहे. (पाहा : द नेहरू इपॉक्). आपण त्या तपशिलात शिरलो तर विस्तार फार होईल.

सप्टेंबर १९५०मध्ये टंडन यांनी तयार केलेल्या कॉंग्रेस कार्यकारिणीवर सदस्य म्हणून राहायला नेहरू तयार झाले होते. प्रश्न कॉंग्रेस निवडणूक समितीवर जे पाच सदस्य कॉंग्रेस कार्यकारिणीने नेमावयाचे, त्यांचा होता. त्याबाबत एकमत होईना व तो प्रश्न लोंबकळतच राहिला. एकदा नेहरू व आझाद यांनी सुचविले, की कृपलानी व किडवाई यांना निवडणूक समितीवर पाठविण्याला टंडन यांनी संमती द्यावी. ही सूचना टंडन यांना मान्य होती. पण किडवाई व कृपलानी यांना कॉंग्रेसमधील दोन गटांत समझोता व्हावा, असे वाटतच नव्हते. त्यांना असे चित्र उभे करावयाचे होते, की कॉंग्रेसमधील कडवा गट नेहरूंना एकाकी पाडून कोंडीत पकडण्याच्या विचारात आहे. त्यामुळे दोघांनीही निवडणूक समितीवर जाण्याचे नाकारले. कृपलानींनी तर कॉंग्रेसच सोडली व कॉंग्रेसमधील असंतुष्टांना बरोबर घेऊन जून १९५१ मध्ये 'कृषक मझदूर प्रजा पार्टी' नावाचा पक्ष काढला. किडवाईंनी कॉंग्रेस सोडली नाही व नेहरूमंत्रिमंडळातून राजीनामाही दिला नाही; पण ते नव्या पक्षाच्या कार्यकारिणीवर मात्र होते.

अखिल भारतीय कॉंग्रेस समितीची बैठक जुलै १९५०

मध्ये बंगलोरला भरली. त्या वेळी २९ सदस्यांनी असा ठराव मांडला की, "काँग्रेस संघटनेत ऐक्य निर्माण करून काँग्रेस मजबूत केली पाहिजे." त्यावर नेहरू म्हणाले, की, "नुसते ऐक्याचे ठराव करून भागणार नाही. आपण निवडणुका लढविण्यासाठी जी यंत्रणा उभारू, तिने लोकांच्यात विश्वास उत्पन्न केला पाहिजे." तेव्हा बिहारचे मुख्यमंत्री श्रीकृष्ण सिन्हा यांनी ठराव मांडला, की "लोकसभा व विधानसभा यांतील जागांसाठी काँग्रेसचे उमेदवार निवडण्याचे सर्व अधिकार पंतप्रधानांना द्यावेत." स.का. पाटील यांनी सुचविले, की "सध्याच्या निवडणूक समितीची फेररचना करावी." नेहरू म्हणाले, की "नुसती निवडणूक समिती नव्हे, कार्यकारिणीचीच पुनर्रचना केली पाहिजे." त्यावर टंडन म्हणाले, की "कार्यकारिणी मी नेमली आहे. तिची पुनर्रचना करण्यापेक्षा मीच राजीनामा देतो." तेव्हा टंडन यांनी सहेतुकपणे द्वारका प्रसाद मिश्रा यांच्याकडे नजर लावली. त्यातील सूचना ओळखून मिश्रा म्हणाले, "आम्हाला काँग्रेसमध्ये लोकशाही हवी आहे. खुद्द नेहरूंनीच १९३७ साली एक लेख लिहून म्हटले होते, की" "आम्ही कोण्या 'सीझर'ला खपवून घेणार नाही." मिश्रांच्या या म्हणण्याला हनुमंतय्या यांनी पाठिंबा दिला. नेहरूंच्या बाजूने कोणीच बोलेना. तेव्हा नेहरूंनी विचारले, की "लोकसभा व विधानसभा मिळून किती जागा आहेत?" उत्तर मिळाले की चारहजार जागा आहेत. तेव्हा नेहरूंनी सांगितले, की "माझ्या मागची कामांची गर्दी पाहता, ही निवड करणे मला जमणार नाही." मिश्रा यांचा कयास आहे की, श्रीकृष्ण सिन्हांनी 'नेहरूंना सर्वाधिकार द्यावेत' हा ठराव मांडला, तो किडवाई यांच्या आग्रहाखातर.

बंगलोरच्या बैठकीत नेहरूंना ज्या नामुष्कीला तोंड द्यावे लागले, तिने त्यांचा तिळपापड झाला. नंतर किडवई व अजित प्रसाद जैन यांनी मंत्रिमंडळातून राजीनामे दिले व ते नेहरूंना स्वीकारावे लागले. तेव्हा या प्रकरणाचा (टंडन व नेहरू यांच्यातील भांडणाचा) सोक्षमोक्ष लावावा, या उद्देशाने नेहरूंनी काँग्रेस कार्यकारिणी व निवडणूक समिती या दोन्हींचे राजीनामे दिले. राजीनाम्याच्या पत्रात (९ ऑगस्ट १९५०) नेहरूंनी टंडन यांना लिहिले होते, "काँग्रेस निवडणुका जिंकेलही. पण तिने आत्मा गमावलेला असेल." आता टंडन यांनी पुनः राजीनामा देण्याची तयारी दाखविली. कार्यकारिणीच्या सदस्यांनी नेहरूंच्या अनुपस्थितीत ठराव केला, की "आम्ही सारे राजीनामा देतो. नेहरूंनी पाहिजे तशी कार्यकारिणीची रचना करावी. नेहरूंची इच्छा असल्यास त्यांनी टंडन यांना अध्यक्षपदी ठेवावे." नेहरूंनी पुनः स्पष्ट केले की, "टंडन यांच्या अध्यक्षतेखाली मला कार्यकारिणीवर काम करता येणार नाही." यानंतर अखिल भारतीय काँग्रेस समितीची सभा ८-९ सप्टेंबर १९५१ रोजी दिल्लीला भरली. समितीने टंडन यांचा राजीनामा स्वीकारला व नेहरूंची तेथे स्थापना केली. पुढे १९५४ पर्यंत नेहरू काँग्रेसचे अध्यक्ष राहिले.

या घटनाक्रमावरून एक स्पष्ट होते, की आपल्या वलयांकित नेतृत्वाचा विश्वास असणाऱ्या नेहरूंसारख्या नेत्यालाही हे पटले होते, की रयतेशी आपण परस्पर संवाद साधू शकत असलो व जनतेचे आपल्यावर कितीही प्रेम असले, तरी आपल्या मागे पक्ष हा असावाच लागतो. देशाचा कारभार सार्वमतावर (रेफरेंडम) चालत नाही. पक्षसंघटनेच्या माध्यमातूनच, उद्रेकाचा (क्रायसिस) कालखंड सोडला तर, प्रजेशी दळणवळण ठेवावे लागते. यासाठी पक्षसंघटना नेत्याच्या अधीन असलीच पाहिजे असे नाही; पक्षांतर्गत विचारविनिमयातून आपण पक्षाला आपल्या धोरणाचे महत्त्व पटवून देऊन काम चालवू शकतो. तथापि, पटेलांची पक्षावर जी पकड होती, तिची झळ नेहरूंना स्वातंत्र्यानंतरच्या पहिल्या चार वर्षांत अतिशय दाहकतेने पोचली. परिणामी पटेल गेल्यावर त्यांनी पक्षाला आपल्या अधीन करून टाकले.

नंतर नेहरूंनी योजनाबद्ध विकासाचा मार्ग स्वीकारला. जर पक्ष समर्थ राहिला असता व पक्षांतर्गत विचारविनिमय खुला असता, तर या विकासाला गती देण्यासाठी त्याचा उपयोग झाला असता; पण आता नेहरूंच्या भुवयांच्या हालचालींवर माना डोलावणारे नेते अग्रस्थानी आल्यामुळे विकासकार्यासाठी नेहरूंना सर्वस्वी नोकरशाहीवर विसंबून राहावे लागले आणि त्यामुळे विकासाची अनेक कामे–जनतेचा पाठिंबा व सहकार्य न मिळून–मंद गतीने होऊ लागली किंवा थांबूनच राहिली.

**संदर्भग्रंथ :**

१. डी. ए. लो – ब्रिटन अॅण्ड इंडियन नॅशनॅलिझम,

केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज १९९७.
२. सर्वपल्ली गोपाळ-जवाहरलाल नेहरू (खंड २ रा) ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, दिल्ली १९७९.
३. डी. पी. मिश्रा - द नेहरू इपॉक, हर-आनंद पब्लिकेशन्स, नवी दिल्ली २००१.

☆☆☆

---

## लेखकांचा परिचय

❋ **डॉ. भारती पाटील**
प्राध्यापिका, राज्यशास्त्र विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर; गांधी अभ्यास केंद्राच्या प्रमुख.
***पत्ता :–*** राज्यशास्त्र विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४१६ ००४.

❋ **प्रा. डॉ. शिवाजी पाटील**
राज्यशास्त्र विभाग, छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा.
***पत्ता :*** छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा. दूरध्वनी : ९६७३६३३९५५.

❋ **डॉ. अवनीश पाटील**
इतिहासाचे प्राध्यापक, रयत शिक्षण संस्थेच्या महिला महाविद्यालय, उंब्रज.
***पत्ता :–*** द्वारा, डॉ. आर. एन. पाटील, प्लॉट नं. १४७, हौसिंग सोसायटी, नं. ४, रत्नाप्पा कुंभार नगर, कोल्हापूर ४१६ ०१३.

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

*'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.*

*४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| पुस्तक | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु |
| ■ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु |
| ■ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ **इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती)** । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील | १५० रु |
| ■ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | ३० रु |
| ■ **कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार** | १०० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु |
| ■ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु |
| ■ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र** : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ **हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ **पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास** (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)फोन :(०२१६७)२२०००६**

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.